# नवभारत

वर्ष ६ वें ] मे १९५३ [ अंक ८ वा



किंमत १ रुपया

अनुक्रमणिका








नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


---

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष सहावें — मे

अंक आठवा — १९५३

# नवभारत

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर-आचार्य स. ज. भागवत - श्री. हरि कृष्ण मोहनी - प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ — सहामाही रु. ५ — अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.






# 'नवभारत', मे १९५३

## —लेखक-परिचय—

[ या अंकांतील खालीं परिचय दिलेल्या लेखकांशिवाय, इतर लेखकांचे लेख या वर्षीच्या मागील अंकांतून आलेले असून, त्या त्या वेळीं त्यांचा परिचय दिला आहे.—का. सं. ]

**डॉ. वा. वि. करंबेळकर** एम्. ए. पीएच्. डी., काव्यवेदान्ततीर्थ, साहित्याचार्य— नागपूर महाविद्यालयांत संस्कृतचे प्राध्यापक व नागपूर विद्यापीठांत प्राचीन-हस्तलिखितग्रंथाधिकारी. 'संस्कृतिप्रदीप', 'भारतीयांचा सांस्कृतिक उत्कर्ष' इत्यादि पुस्तकांचे लेखक. 'अथर्वसंस्कृति' या विषयावरील यांचें पुस्तक प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

**श्री. म. शं. वाबगांवकर**—नागपूर येथील मॉरिस कॉलेजमध्यें बी. ए. च्या वर्गांतील विद्यार्थी.

**श्री. पु. का. ओक** बी. एस्सी. बी. टी.—पुणें येथील नू. म. वि. हायस्कूलमध्यें शिक्षक आणि पर्यवेक्षक ( Supervisor ).

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** ( वाई )—'धर्मकोशा'चे सुप्रसिद्ध संपादक. 'हिंदुधर्मसमीक्षा', 'जडवाद', 'वैदिक संस्कृतीचा विकास' इत्यादि पुस्तकांचे लेखक,

**प्रा. शि. श्री. काळे**—पुणें येथील बृ. म. कामर्स कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

**श्री. केशवराव भोळे** ( पुणें )—सुप्रसिद्ध संगीत-दिग्दर्शक. 'आजकालचे प्रसिद्ध गायक' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. र. के. खाडिलकर** बी. ए. एल्एल्. बी.–( पुणें ) शेतकरी-कामकरी-पक्षाचे एक विचारवंत नेते. गेल्या वर्षी शांततापरिषदेकरितां ते चीनला गेले होते. तेथून परत आल्यावर त्यांनीं नवचीनसंबंधीं लिहिलेल्या लेखांचें 'नवचीनच्या निर्मितीची रूपरेषा' हें त्यांचें पुस्तक नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे.

**श्री. ना. ग. गोरे** ( पुणें )—समाजवादी पक्षाचे एक विचारवंत नेते. 'नेहरूंचें आत्मचरित्र', 'विश्वकुटुंबवाद' इत्यादि पुस्तकांचे लेखक. ते नेपाळ व आसामला नुकतेच जाऊन आले. तेथून आल्यावर त्यासंबंधीं त्यांनीं लिहिलेल्या लेखांचीं अनुक्रमें 'पेटूं लागलेला हिमालय', 'भारताची पूर्व सरहद्द' हीं पुस्तकें नुकतींच प्रसिद्ध झालीं आहेत.

---

* मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

* या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

* मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

डॉ. विनायक वामन करंबेळकर

# संस्कृत व्याकरणांतील भक्तिमार्ग

भारतीय बुद्धिमत्तेनें व्याकरणशास्त्राचा अभ्यास परमोत्कर्षास नेला आणि भगवद्भक्ति ही तर भारताचें वैशिष्ट्य आहे. भारतवर्षीयांच्या या दोन वैशिष्ट्यांत कांहीं अन्योन्यसंबंध असणें शक्य आहे काय ? हा प्रश्न आपाततः असंबद्ध वाटण्यासारखा आहे; पण विचारान्तीं तो तसा वाटण्याचें कारण नाहीं. चिकित्सक बुद्धीनें पदपदार्थांचें निरीक्षण आणि विश्लेषण करतांना आमचे वैयाकरण ईश्वरदत्त अशा आपल्या भक्तिरूपी देणगीला विसरले कीं काय हेंच आपणांस पाहावयाचें आहे. व्याकरण आणि भक्ति या दोहोंत विषयसंबंध असण्याचें कारण नाहीं, हें खरें. व्याकरणशास्त्रांत ज्यास 'अन्तरङ्गकार्य' म्हणतात असें कांहींच कार्य भक्तीला त्या शास्त्रांत करतां येणार नाहीं. त्यामुळें व्याकरण व भक्ति यांचा संबंध 'बहिरङ्ग' ठरतो. त्यामुळेंच तो शास्त्रदृष्ट्या असिद्ध आहे. तरी देखील व्याकरणांत भक्तीनें कोठपर्यंत प्रवेश केला आहे हें पाहणें अनाठायीं होणार नाहीं.

## व्याकरणशास्त्राचा उद्गम

इतिहासज्ञ व्याकरणाचा उद्गम 'चत्वारि शृङ्गा' (ऋग्वेद ४.५८.३), 'चत्वारि वाक्' (ऋ. १.१६४.४५) वगैरे ऋग्वेदाच्या ऋचांतून, यांतील दुसऱ्या ऋचेच्या 'शतपथ-ब्राह्मणां'त आलेल्या विवेचनावरून (४.१.३.१६) आणि त्यानंतर इतर वैदिक संहितांतील व्याकरणविषयक उल्लेख, पदपाठ, ऋगादि प्रातिशाख्यें, शौनकीय चतुरध्यायी, यास्काचार्यांचें निरुक्त अशा मार्गानें झाला, असें प्रतिपादन करतात. परंतु "महेश्वराच्या ठिकाणीं समुद्राप्रमाणें व्याकरणाचें ज्ञान आहे; त्यांतून अर्धा घट भरण्याइतकें बृहस्पतीच्या ठिकाणीं आलें; त्याचाहि एक भागच होईल इतकें इन्द्राला प्राप्त झालें आणि दर्भाच्या अग्रावर राहणाऱ्या पाण्याच्या थेंबाएवढें व्याकरणाचें ज्ञान पाणिनीच्या ठायीं आलें"[१] असें श्रद्धा सांगते. भारतीयांची श्रद्धाबुद्धि अशाच प्रकारें प्रत्येक शास्त्राचा परमेश्वराशीं संबंध जोडते. व्याकरणाचा उद्गम 'महेश्वरा' पासून झाला यांत शुद्ध भक्ति आहे. याला आधार नन्दिकेश्वराच्या 'काशिके'चा : "नृत्य समाप्त झाल्यावर नटराजानें आपला ढक्का चौदा वेळां वाजविला. तींच सनकादिसिद्धांच्या उद्धारासाठीं निर्माण झालेलीं 'शिवसूत्रें.'"[२] पाणिनीला तपस्यासिद्धीचें फळ म्हणून लाभलेलीं जीं 'अइउण्' वगैरे चौदा माहेश्वरसूत्रें त्या माहेश्वरसूत्रांचा कर्ता म्हणजे प्रत्यक्ष शंकर हा कोणी ऐतिहासिक महेश्वर नव्हता. तसा तो असतां तर पाणिनीनेंच 'आचार्याः', 'आपिशलिः', 'स्फोटायनः', 'गार्ग्यः' यांच्याबरोबर त्याचाहि उल्लेख केला असता. म्हणून वैयाकरणांच्या भक्तीनें भगवान् शंकराकडे व्याकरणशास्त्राचें कर्तृत्व दिलें असें ठरतें.

महेश्वर > बृहस्पति > इन्द्र > पाणिनि, अशा व्याकरणसंप्रदायाचा महाभाष्यांत उल्लेख आहे. "असें म्हणतात कीं, बृहस्पतीनें इन्द्राला दिव्य सहस्र वर्षे प्रतिपद शब्दांचा पाठ सांगितला; परंतु शुद्ध शब्दांचा पाठ संपूर्ण होऊं शकला नाहीं."[३]

---

१ समुद्रवद् व्याकरणं महेश्वरे तदर्धकुम्भोद्धरणं बृहस्पतौ ।
तद्भागभागाच्च गतं पुरन्दरे कुशाग्रबिन्दूत्पतितं च पाणिनौ ॥ —(सारस्वतभाष्य)

२ नृत्तावसाने नटराजराजो ननाद ढक्कां नवपञ्चवारम् ।
उद्धर्तुकामः सनकादिसिद्धानेतद्विमर्शे शिवसूत्रजालम् ॥

३ "एवं हि श्रूयते बृहस्पतिरिन्द्राय दिव्यं वर्षसहस्रं प्रतिपदोक्तानां शब्दानां शब्दपारायणं प्रोवाच नान्तं जगाम" ।—(महाभाष्य पस्पशाह्निक)








असेंच कक्तंत्र व्याकरणांतहि सांगितलें आहे : " आर्य असें म्हणतात, 'ब्रह्म्यानें बृहस्पतीला, बृहस्पतीनें इन्द्राला, इन्द्रानें भारद्वाजाला अशा क्रमानें हा अक्षरसमाम्नाय आला ' "[४]. इतिहासकार या इन्द्राला ' ऐन्द्र ' व्याकरणाचा कर्ता मानतात. परंतु ' कथासरित्सागरां 'त ज्या इन्द्रदत्ताचा ' ऐन्द्र ' व्याकरणाशीं संबंध आणला आहे तो इन्द्रदत्त आणि हा इन्द्र एक मानणें हें खरोखरींच धाडस आहे. बृहस्पतिशिष्य इन्द्र वैदिक काळापासून व्याकरणाचा अध्यापक व अभ्यासक म्हणून प्रसिद्ध आहे ( तै. सं. ६.४.७.३ ). यावरून तो पाणिनिपूर्वकालीन होता हें निश्चित. मग तो जर ऐतिहासिक व्यक्ति असता तर पाणिनीनें खात्रीनें त्याचा आपल्या अष्टाध्यायींत उल्लेख केला असता. तसा उल्लेख आढळत नाहीं. यावरून ' महेश्वरा 'प्रमाणें बृहस्पतिशिष्य ' इन्द्रा 'ला देखील लोकांच्या श्रद्धाबुद्धींतच स्थान आहे असें म्हणणें योग्य ठरेल.

### ' अक्षर ' शब्दाची व्युत्पत्ति

वर्णवाचक ' अक्षर ' शब्द देखील वैयाकरणाच्या श्रद्धाभक्तीकडेच बोट दाखविणारा आहे. न नाश पावणारें, ज्याचें अधिक विच्छेदन करतां येत नाहीं तें अक्षर. वाक्याचे विभाग केल्यानंतर शब्द उरतात. त्या शब्दांची फोड केली कीं अक्षरें उरतात. जें उरतें तें अक्षर, कारण त्यापुढें विश्लेषणाची गति कुंठित होते. ऐतरेय आरण्यकांत परब्रह्माचें असेंच वर्णन येतें[५]. त्याची " न क्षरतीति न चलतीति प्रधानत्वात् अक्षरं स्वर उच्यते " या व्याकरणसिद्ध अक्षर शब्दाच्या व्युत्पत्तीशीं तुलना करून पाहण्यासारखी आहे. परब्रह्म आणि अक्षर यांचें एकत्व भर्तृहरीनें 'वाक्यपदीया 'च्या पहिल्याच श्लोकांत गृहीत धरलें आहे.[६] वर्णोच्चार झाल्याबरोबर त्रिक्षणावस्थायी ध्वनि लगेच नाश पावतो. पण त्याच्या संस्कारानें ' स्फोट ' नामक नित्य शब्द अन्तःकरणांत जागृत होतो. हेंच तत्त्व वेदान्त्यांनीं निराळ्या शब्दांत मान्य केलें आहे. ' अक्षराणामकारोऽस्मि ' ( गीता १०.३३ )[७] असें सांगून किंवा ' ओमित्येकाक्षरं ब्रह्म ' असें म्हणून ( गीता. ८. १३ ) भगवंतांनींच अन्तःकरणांत जागृत होणारा नित्य शब्द व प्रत्यक् चैतन्य एक असल्याची कबुली दिली आहे. वैयाकरणांची ही तत्त्वनिष्ठा सर्वमान्य झाली आहे.

### पाणिनीय व्याकरणांतील उदाहरणें

व्याकरण हा विषयच असा आहे कीं त्यांत भाषेंतील शब्दांच्या प्रवृत्ती ओळखून त्यांच्याविषयीं नियम बनविण्यांत वैयाकरणांची मति गुंतून पडलेली असते. प्रत्यक्ष पाणिनीच्या 'अष्टाध्यायी'त तर अगदीं सूत्ररूपानेंच नियम दिलेले असल्यामुळें त्यांत इतर कोणताच विषय येणें शक्य नाहीं. त्यामुळें भट्टोजी दीक्षितानें आपल्या 'सिद्धान्त-कौमुदी'त जीं उदाहरणें दिलीं आहेत तींच विचारांत घेणें भाग पडतें. त्यांतल्या त्यांत संधि, समास, कारक, कृत्, तद्धित वगैरे प्रकरणांत उदाहरणें देण्याला थोडा अधिक अवकाश सांपडतो, म्हणून तिकडे लक्ष दिलें तर ' सुद्धयुपास्यः ', ' श्रीशः ', ' दैत्यारिः ', ' शिवायोंनमः ', ' हरिः शेते ', ' शार्ङ्गिञ्जय ', ' हरिं वन्दे ', ' सैष दाशरथी रामः ', अजन्तांत चालवून दाखविलेले राम, रमा वगैरे शब्द आणि विशेषतः कारकप्रकरणांत आलेलीं–' हरिः सेव्यते ',

---

४ यथार्या ऊचुः । ब्रह्मा बृहस्पतये प्रोवाच । बृहस्पतिरिन्द्राय । इन्द्रो भारद्वाजाय । ...... तं खल्विममक्षरसमाम्नायमित्याचक्षते । —( कक्तन्त्रव्याकरण )

५ एष वा अक्षरम् , एष ह्येभ्यः सर्वेभ्यो भूतेभ्यः क्षरति, न चैनमतिक्षरन्ति ।

६ अनादिनिधनं ब्रह्म शब्दतत्त्वं यदक्षरं । विवर्ततेऽर्थभावेन प्रक्रिया जगतो यतः ।।

७ एक सुभाषितकार या गीतेच्या श्लोकांतील ' अकारा 'वर कोटी करून राजाची स्तुति करतो : " अक्षराणामकारोऽहमिति विष्णुः स्वयं ब्रुवन् ।
भवता सोऽपि यत्सत्यमाकारेण लघूकृतः ।। " —( सुभाषितावलि २४६० )










अनुक्रमणिका

# संस्कृत व्याकरणांतील भक्तिमार्ग

' शत्रूनगमयत्स्वर्गं वेदार्थं स्वानवेदयत् ।
आशयच्चामृतं देवान् वेदमध्यापयद्विधिम् ॥
आसयत्सलिले पृथ्वीं यः स मे श्रीहरिर्गतिः ॥ '

' अधिशेते वैकुण्ठं हरिः ', ' हा कृष्णाभक्तम् ', ' अन्तरेण हरिं न सुखम् ', ' पुण्येन दृष्टो हरिः ', ' हरये रोचते भक्तिः ', ' भक्तिर्ज्ञानाय कल्पते ', वगैरे सर्व उदाहरणें भगवद्भक्तिप्रधानच आहेत. त्याचप्रमाणें 'प्रौढमनोरमें'त देखील अशीं अनेक उदाहरणें आलीं आहेत. त्यांपैकीं एक लक्षांत ठेवण्यासारखें आहे :

" शास्त्रापासून उत्पन्न झालेल्या श्रेष्ठ वस्तूचा अनुभव आल्यानंतर व प्राकृत प्रपञ्चाचा विलय झाल्यानंतर जी वस्तु उत्पन्न होते ती नुसती अनुभवाच्याच स्वरूपाची ! मग ही ती वस्तु असें पंडित देखील कसा जाणूं शकेल ? " [८]
या उदाहरणाची मौज अशी आहे कीं यांत वरचा अर्थ परब्रह्मपर आहे, पण खरा अर्थ मात्र ' इयत् ' रूपसिद्धि करणारा आहे.

त्याचप्रमाणें ' धातुपाठां 'त धातूंचे जे अनेक अर्थ दिले आहेत त्यांत मधून मधून भगवद्भक्ति किंवा वैराग्य व्यक्त करणारी रचना दृग्गोचर होते.[९] पुरुषोत्तमाच्या ' प्रयोगरत्नमाले 'त " ' तद्धिताध्यायाप्रमाणें ' असलेल्या हरीचें मी आराधन करतों " अशा अर्थाचा श्लोक आला आहे.[१०] तसेंच ' वासुदेवविजयकाव्य ' व 'धातुकाव्य' हीं व्याकरणांत भक्ति आणणारीं आहेत. पंडितराज जगन्नाथ हा जसा साहित्यमीमांसक होता तसाच तो मोठा वैयाकरणहि होता. त्याच्या ' रसगंगाधरां 'त व्याकरण आणि भक्ति यांचा समन्वय करणारा पुढील श्लोक येतो :

गुणवृद्धी परे यस्मिन्नैव स्तः प्रत्ययात्मिके ।
बुधेषु सदिति ख्यातं तद् ब्रह्म समुपास्महे ॥

## संस्कृत कवींची व्याकरणद्वारें भक्ति

कालिदास, भारवि, श्रीहर्ष, मुरारि, भट्टि, जगन्नाथ वगैरे अनेक कवींनीं आपापल्या काव्यांतून व्याकरणविषयक पारिभाषिक शब्दांचा उपयोग करून अलंकारांचें वैचित्र्य साधलेलें अनेक ठिकाणीं आढळतें. ' तो वर आणि वधूचा संयोग प्रत्यय आणि प्रकृतींच्या संयोगाप्रमाणें जमला.' ( रघु.११.५६ ) " प्रकृति व प्रत्यय यांच्यामध्यें येणाऱ्या अनुबंधाप्रमाणें पराभव प्राप्त करून घेण्यासाठींच शत्रु मध्यें आला. " ( किरात १३.१९ ). पण असल्या उदाहरणांत भक्तीचा ओलावा नाहीं. त्याचप्रमाणें कथेच्या ओघांत व्याकरणाचे विशिष्ट पारिभाषिक शब्द वापरून केलेली काव्यरचना देखील भक्तीला पोषक झालेली नाहीं.

कालिदासाच्या काव्यांतहि हा प्रकार आढळतो. " वालीला ठार करून त्याच्या चिरकांक्षित पदावर त्यानें, धातूच्या स्थानीं जसा आदेश आणावा त्याप्रमाणें, सुग्रीवाची स्थापना केली. " ( रघु. १८.५८ )

" रामाच्या आज्ञेनें, त्याची इच्छित गोष्ट तडीस नेण्यासाठीं, सेना त्याच्या मागून गेली; ज्याप्रमाणें अध्ययन हा अर्थ प्राप्त व्हावा म्हणून ' इ ' धातूमागून ' अधि ' उपसर्ग जातो. " ( रघु. १५.९ )

" रघुवंशांतील कोणीहि एखादा शत्रूला तापदायक असा राजा, अपवाद ज्याप्रमाणें सामान्य नियमाचा बाध करतो, त्याप्रमाणें, शत्रूचा पराभव करण्यास समर्थ आहे. " ( रघु. १५.७ ) ' कुमारसंभवां 'त देखील उत्सर्गापवादाची उपमा आली

---

८ " किमिदंभ्यां वो घः " या सूत्रावर उदाहरणांत पुढील श्लोक येतोः
उदितवति परस्मिन्प्रत्यये शास्त्रयोनौ गतवति विलयं च प्राकृतेऽपि प्रपञ्चे ।
सपदि पदमुदीतं केवलः प्रत्ययो यत् तदियदिति मिमीते को हृदा पण्डितोऽपि ॥
—( प्रौढमनोरमा )

९ भूसत्तायां विनष्टायां धनधान्ये गतेऽपि च ।
गते च तनुविस्तारे वद स्थैर्यं ऽत्र का कथा ॥ —( धातुपाठ )

१० चित्रार्थपदनिर्माणनिदानप्रत्ययाश्रियाम् ।
निधानं तद्धिताध्यायप्रायमाराधये हरिम् ॥ —( प्रयोगरत्नमाला ७–९६०. )

आहे (२.२७). 'नैषधीयचरितां'त श्रीहर्षानें देखील अशा कल्पना आणल्या आहेत;[११] परंतु त्यांत भक्तीचें स्वारस्य नाहीं हें मान्य करावें लागतें. परंतु

" वागर्थाविव संपृक्तौ वागर्थप्रतिपत्तये ।
जगतः पितरौ वन्दे पार्वतीपरमेश्वरौ ॥

असें (रघु. १.१.) क्वचित् आढळणारें काव्य व्याकरणद्वारें भक्तीचा उद्रेक व्यक्त करतें. याच प्रकारचा पंडितराज जगन्नाथाचा श्लोक (भामिनी. ३.८)

" वज्रं पापमहीभृतां भवगदोद्रेकस्य सिद्धौषधं
मिथ्याज्ञाननिशाविशालतमसः तिग्मांशुबिम्बोदयः ।
क्रूरक्लेशमहीरुहामुरुभरज्वालाजटालः शिखी
द्वारं निर्वृतिसद्मनो विजयते कृष्णेति वर्णद्वयम् ॥ "

किंवा 'पद्यवेणी'तील (४८२)

" व्यञ्जनस्वरसमानसंज्ञका
कान्तवर्णपदशब्दसाधना ।
सन्धिवृत्तिरिव कृष्णकामिनी
यामिनीमपि निनाय मानतः ॥ "

हा श्लोक हे व्याकरणद्वारें केलेल्या भक्तिसाधनेचे द्योतक आहेत.

## मुरारि आणि भट्टि

संस्कृत नाटकांत मुरारीचें 'अनर्घराघव' व काव्यांत भट्टीचें 'भट्टिकाव्य' हीं दोन्हीं रामचरित्रावर आधारलेलीं आहेत. दोहोंत व्याकरणप्राधान्य आणि रामभक्ति सारखींच आहेत. तरी तुलना केली असतां, व्याकरणाच्या क्लिष्ट रूपसिद्धींतून का होईना, मुरारीच्या नाटकांत जशी भक्तीची सरसता आढळते तशी 'भट्टिकाव्यां'त नाहीं. सहज जातां जातां, (४.४४) किंवा (१.५८) यांमधून अनुक्रमें 'स्याच्चेद् ब्रह्मगणोऽयमाकृतिगणः'

" यदिन्दोरन्वेति व्यसनमुदयं वा निधिरपा-
मुपाधिस्तत्रायं जयति जनिकर्तुः प्रकृतिता ॥ "

असे व्याकरणाचे उल्लेख तो करीत असला तरी " ज्याच्या उजव्या हाताच्या बोटाजवळ लावलेल्या भस्मानें, स्वेदजलानें आर्द्र झालेल्या, डाव्या कुच-मंडलावरील पत्रावलिरचना पुसून टाकली आहे अशा, स्त्री, पुरुष व नपुंसक या तिन्हीं लिंगांच्या पलीकडे असलेल्या शम्भुदेहाची चतुर्थ प्रकृति तुम्हांस सुख देवो. "[१२] अशा भक्तिरसपरिप्लुत हृदयंगम कल्पना त्याच व्याकरणाच्या वैशिष्ट्यांतून व्यक्त करण्यास तो चुकणार नाहीं. उलट 'भट्टिकाव्यां'त २२ व्या सर्गांत रामाची कथा आली आहे व त्यांत मधूनमधून (६.६२)

" प्रगृह्यपदवत्साध्वीं स्पष्टरूपामविक्रियाम् ।
अगृह्यां वीतकामत्वाद्दिवगृह्यामीनिन्दिताम् ॥ "

('रामलक्ष्मणांनीं पाहिलेली शबरी प्रगृह्य स्वराप्रमाणें होती') असा कांहींसा व्याकरणाचा कथेशीं संबंध जोडण्याचा प्रयत्न झाला आहे. पण कवीच म्हणतो त्याप्रमाणें 'भट्टिकाव्य' हें 'व्याख्येच्या मदतीनें समजण्यासारखें काव्य आहे, कवीनें आपल्या विद्वत्तेनें मंदमति लोकांना ठार केलें आहे.' तेथें अर्थातच भक्तीला वाव नाहीं हें उघड आहे. 'भट्टिकाव्य' म्हणजे व्याकरणाची प्रयोगभूमि आहे. असाच प्रकार हलायुधाच्या 'कविरहस्या'चा आहे. शिवराम त्रिपाठीची 'नक्षत्रमाला' जरी प्रत्येक श्लोकांत एक एक पाणिनीय परिभाषा आणावयाची अशा निश्चयानें लिलिलेली आहे तरी त्याचा मुख्य विषय शृंगार आहे, भक्ति नाहीं. त्याचप्रमाणें 'धातुकाव्य' भक्तिपर आहे हें खरें पण त्यांत व्याकरणाच्या भाराखालीं भगवद्भक्ति चेंगरून गेली आहे.[१३]

---

११ उभयी प्रकृतिः कामे सज्जेदिति मुनेर्मतम् । अपवर्गे तृतीयेति भणतः पाणिनेरपि ॥
—(नैषधीय. १७.७).

१२ स्वेदार्द्रवामकुचमण्डलपत्रभङ्गसंशोषिदक्षिणकराङ्गुलिभस्मरेणुः ।
स्त्रीपुंनपुंसकपदव्यतिलङ्घिनी वः शम्भोस्तनुः सुखयतु प्रकृतिश्चतुर्थी ॥
—(अनर्घराघव ७.३९)

१३ वासुदेवकविविरचित 'वासुदेवविजयकाव्य' हें भट्टिकाव्यासारखेंच काव्य आहे. 'धातुकाव्य' ही त्याची पूरणिका आहे. (दोन्ही काव्यांसाठीं 'काव्यमाला', दशम गुच्छक पाहा).










# संस्कृत व्याकरणांतील भक्तिमार्ग

'राघवपाण्डवीया'सारखीं द्व्याश्रय काव्यें किंवा 'महिम्नस्तोत्रा'वरील मधुसूदनसरस्वतीच्या टीकेसारख्या द्व्यर्थी टीका भक्तीचें निमित्त करून पाण्डित्याचा आविष्कार करण्यासाठींच असतात.

## संस्कृत सुभाषितें

व्याकरण आणि भक्ति यांचा समन्वय करणारीं कांहीं सुभाषितें सुभाषितसंग्रहांतून आढळतात. त्यांपैकीं कांहीं नाममात्र भगवंताचा संबंध आणतात. उ. "हरि कोठे निजतो, निकृष्ट काय असतें, कोणती वस्तु पुष्कळ असते, सर्वांत रमणीय काय?" या प्रश्नांचीं उत्तरें क्रमानें "शेषे सेवा वा पररूपम्" या कातन्त्रव्याकरणाच्या सूत्रांत दिलेलीं आहेत.[१४] कांहींत आणखी निराळा प्रकार आढळतो. उ. "ज्यानें तितिक्षा गुणाचा अंगीकार केला आहे, जो गुणी लोकांवर निष्ठा ठेवतो आणि जो सर्वगुणयुक्त आहे तो राजसत्तम श्रीराम मृष् धातुप्रमाणें आहे."[१५] किंवा

"सर्व जगताला कोण नष्ट करतो, विष्णूनें काय धारण केलें, नीच कशानें गर्विष्ठ बनतो? यांबाबत पाणिनीचें सूत्र कोणतें?"[१६] किंवा

"शास्त्राचा आधार न घेतांच लोक हरि आणि हर यांत भेद मानतात; यांची प्रकृति (धातु) एकच आहे परंतु प्रत्ययाच्या भेदामुळें भेद भासतो"[१७] किंवा

"'स्वतःचा पति हा प्रथम प्रणयी आणि हरि हा दुसरा! या अडचणींत हे गोपिके! मी काय करूं?' 'सखि, पाणिनीचें सूत्र ऐक: 'विप्रतिषेधे परं कार्यम्।'"[१८]

## हरिनामामृत

संस्कृत काव्यांत किंवा सुभाषितांत जी भक्ति व्याकरणद्वारानें प्रकट झाली ती यदृच्छया झाली. कवीला व्याकरणाची परिभाषा किंवा सूत्र सोयिस्कर वाटलें म्हणून त्याचा त्यानें स्वतःची भक्तिकल्पना मंडित करण्याकडे उपयोग करून घेतला. परंतु इसवी सनाच्या १३-१५ व्या शतकांत संस्कृत भाषेचीं जीं लहानलहान व्याकरणें तयार झालीं तीं पाहिलीं म्हणजे तत्कालीन वैयाकरणांची बुद्धि कशी भक्तिप्रवण झाली होती हें आपणांस समजून येतें. थोडक्या प्रयासांत लोकांना संस्कृत भाषेचें ज्ञान करून द्यावें हा जसा या व्याकरणांचा हेतु होता तसें "अजितनाम वदो भलत्या मिसें" हें त्यांचें ध्येय होतें. संस्कृत व्याकरण हरिनाममय करून त्यांनीं जणुं नवीनच भक्तिमार्ग स्थापन केला. १३ व्या शतकांत बोपदेवानें आपल्या 'मुग्धबोधां'त प्रक्रियांसाठीं जीं उदाहरणें निवडलीं तीं सर्व शिवविष्णुनामात्मक होतीं. पण १५-१६ व्या शतकांत चैतन्यसांप्रदायिकांनीं बोपदेवाच्या पुढें आघाडी मारली. नुसतीं हरिनामाचीं उदाहरणेंच काय, व्याकरणाचे पारिभाषिक शब्द देखील त्यांनीं हरिनामापासून तयार केले!

चैतन्यसंप्रदायाचा प्रसार वृन्दारण्याच्या आसपास बऱ्याच प्रमाणांत झाला होता. वृन्दावनाच्या एकान्तांत या सांप्रदायिकांनीं फार मोठी ग्रन्थरचना केली. चैतन्यसंप्रदायांत अनेक विद्वान् भक्त होऊन गेले. त्यांच्या ग्रंथांचा मुख्य विषय भक्ति हाच होता. इतर विषयांकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें

---

१४ क्व हरिः शेते का च निकृष्टा को बहुलार्थः किं रमणीयम्।
वद कातन्त्रे कीदृक् सूत्रं शे षे से वा वा पररूपम्॥

१५ अङ्गीकृततितिक्षः सेड् गुणिनिष्ठापरो यथा।
मृषिस्तथा विजयते श्रीरामो राजसत्तमः॥ —(पद्यामृततरंगिणी ४५.)

१६ को नयति जगदशेषं क्षयमथ बिभरांबभूव कं विष्णुः।
नीचः कुत्र सगर्वः पाणिनिसूत्रं च कीदृक्षम्॥ ('यमो गन्धने') (यमः, अगम्, धने.)

१७ हरिहरयोरिह भेदं कलयति लोको विना शास्त्रम्।
अनयोःप्रकृतिरभिन्ना प्रत्ययभेदाद् विभिन्नवद् भाति॥

१८ निजपतिराद्यः प्रणयी हरिर्द्वितीयः करोमि किं गोपि।
शृणु सखि पाणिनिसूत्रं 'विप्रतिषेधे परं कार्यम्'॥

असें मात्र नाहीं. त्यांचे स्मृति, व्याकरण [१९] वगैरे ग्रंथ उपलब्ध आहेत. त्यांत जीवगोस्वामीचें 'हरिनामामृत' व्याकरण विशेष उल्लेखनीय आहे. याच नांवाचें रूपगोस्वामीचेंहि एक व्याकरण आहे. चैतन्यसंप्रदायांत रूपगोस्वामीचें नांव फार मोठें आहे. बंगालच्या शहा अल्लाउद्दिन हुसेनची नोकरी सोडून देऊन तो वैष्णव संन्यासी बनला होता. त्यानें अनेक ग्रंथ रचले. त्यांतच 'हरिनामामृता'चा अन्तर्भाव होतो. परंतु आज जें 'हरिनामामृत' उपलब्ध आहे तें जीवगोस्वामीचें आहे. आपल्या व्याकरणाच्या उपोद्घातांत तो वैष्णव लेखक म्हणतो :

"आजपर्यंत शब्दानुशासनाचे जे ढीग रचले गेले ती व्यर्थ बडबड आहे असें पाहून, वैष्णवांनीं चिंतन करण्यास योग्य असें हरिनाममय व्याकरण तयार केलेलें आहे." "व्याकरणाच्या वाळवंटांत पापमय जीवन कंठणाऱ्यांनीं हें हरिनामामृत प्यावें व शेंकडों वेळां त्यांत अवगाहन करावें." "श्रीहरीला नमस्कार करून व्रजवासी भक्तांनीं हें सरस 'हरिनामामृत' व्याकरण सेवन करावें."

जीवगोस्वामीच्या मतानें कोणत्याहि स्वरूपांत ईश्वरनामस्मरण केलें तरी देखील तें पापहर असतें.[२०] म्हणून त्यानें प्राचीन वैयाकरणांची "अर्धमात्रालाघवेन पुत्रजन्मोत्सवं मन्यन्ते वैयाकरणाः।" ही म्हण व तदनुसार व्याकरणाचीं सूत्रें ऱ्हस्वतर करण्याची पद्धति या दोहोंचा जोरदार विरोध केला आहे. तो म्हणतो :

'मात्रालाघवमात्रं पुत्रोत्सव इति परेऽभिमन्यन्ते
हरिनामाक्षरलाभात् वयं त्वमूदृक् तिरस्कुर्मः॥'

'हरिनामाच्या लाभापुढें मात्रालाघवानें मिळणारा पुत्रजन्मोत्सवतुल्य आनंद आम्ही तुच्छ लेखतों.'

'हरिनामामृतां'त सर्व वर्ण नारायणापासून उत्पन्न झाले असें सांगून, व्याकरणास आवश्यक अशी सर्व परिभाषा नवीनच तयार करण्यांत आली आहे. वर्ण म्हणजे राम. त्याचे दोन भेद सर्वेश्वर (स्वर) आणि विष्णुजन (व्यंजन). सर्वेश्वरांत कांहीं वामन (ऱ्हस्व, लघु), कांहीं त्रिविक्रम (दीर्घ, गुरु) व कांहीं महापुरुष (प्लुत) असतात. अनुस्वाराला विष्णुचक्र म्हटलें आहे कारण तो सुदर्शनाप्रमाणें दिसतो. विसर्ग म्हणजे विष्णुसर्ग, कारण ब्रह्मलोकावर वैकुंठ व ध्रुव असे दोन लोक आहेत व ते दिसतात दोन बिंदूंप्रमाणें. जेथें परिभाषेंत 'सर्व' शब्द येईल तेथें 'कृष्ण' शब्द उपयोगांत आणला आहे. उदा. सर्वनाम = कृष्णनाम, सार्वधातुक = कृष्णधातुक. कारण, भागवतपुराणांत "कृष्णस्तु भगवान् स्वयम्" (१.३.२८) असें म्हटलें आहे. याप्रमाणें कोणत्या तरी स्पष्ट किंवा अस्पष्ट कारणावरून हरिनामात्मक परिभाषा तयार करण्याचें श्रेय 'हरिनामामृता'नें मिळविलें आहे.

जेथें प्रत्यक्ष भगवंताचें नांव वापरलें नसेल तेथें तत्सदृश व तत्संबंधींची परिभाषा तयार केलेली आहे. उदा. उपधा = उद्धव; परस्मैपद = परपद; आत्मनेपद=आत्मपद; संयोग=सत्संग इत्यादि.

दहा काळ व अर्थांना हरिनामामृतांत जीं नांवें आहेत तीं खरोखरींच चमत्कारजनक आहेत. उदा. वर्तमान=अच्युत; भविष्य=कल्कि; भूत=भूतेश वगैरे. या सर्व नांवांमागें कांहीं तरी औचित्य असतेंच. शाक्त व्याकरणांत याच दहा काळ व अर्थांना दश महाविद्यांचीं नांवें दिलीं आहेत.[२१] त्यापेक्षां दश लकारांना हरिनामामृतानें दिलेलीं नांवें अधिक रोचक व सयुक्तिक आहेत.

---

१९ आणखी एक 'चैतन्यामृत' नामक व्याकरण आहे असे उल्लेख आढळतात—Colebrooke-"Miscellaneous Essays" (ii. 48.) Rajendralal Mitra. L. G. R. p. 163.

२० साङ्केत्यं पारिहास्यं वा स्तोभं हेलनमेव वा । वैकुण्ठनामग्रहणमशेषाघहरं विदुः॥

२१ (१) काली (२) तारा (३) षोडशी (४) भुवनेश्वरी (५) भैरवी (६) छिन्नमस्ता (७) धूमावती (८) बगला (९) मातंगी (१०) कमला.

# संस्कृत व्याकरणांतील भक्तिमार्ग

### शैव व्याकरण

'चैतन्यामृत' व्याकरण अद्यापि उपलब्ध झालेलें नाहीं. दुसरें 'विज्जलभूपति' कृत 'प्रबोधचन्द्रिका' नांवाचें व्याकरण आहे त्यांतील उदाहरणें रामनामात्मक आहेत असें म्हणतात. हीं झालीं वैष्णव व्याकरणें. वैष्णवाचे प्रयत्न पाहून शैवांनीं देखील आपल्या अभीष्ट देवतेच्या गौरवार्थ शैव व्याकरणें लिहिलीं. त्यांपैकीं 'प्रबोधप्रकाश' नामक शैव व्याकरणाचा कर्ता बलराम पंचानन हा एक बंगाली ब्राह्मण होता. या व्याकरणाचा काळ निश्चितपणें समजत नाहीं. यांत कांहीं कारिका व थोडीं सूत्रें आहेत. यांत स्वर = शिव; व्यंजनें = हर अशी परिभाषा आली आहे. संधीचे शक्तिसंधिपाद, शिवसंधिपाद, विसर्गसंधिपाद असे भेद केलेले असून सर्वत्र हीच पद्धति कायम ठेवलेली आहे. (उदा. शक्त्यन्त पुल्लिंगपाद, शिवान्तपुल्लिंगपाद वगैरे). अशाच प्रकारें कांहीं इतर प्रयत्नहि झालेले आहेत. या प्रयत्नांमागें भक्तीची प्रेरणा होती यांत संशय नाहीं. व्याकरणद्वारें भगवद्भक्ति करण्याच्या भारतीय वैयाकरणांच्या ह्या प्रवृत्ती-वरून त्यांच्या एकान्तिक ईश्वरप्रेमावर असा निराळ्याच मार्गानें प्रकाश पडतो.

---

# मनांत माझ्या—

मनांत माझ्या मरतुकडें कधिं
कुत्रें हंसतें चघळित हाडुक
मनांत माझ्या तगमगतो कधिं
सर्पमुखांतील मरता बेडुक.

मनांत माझ्या मत्तयौवना
निजते होऊन कुणी नागवी
अन् लुटतां तें कधि नवयौवन
विजयसुखाची उबग आग वी.

मनांत माझ्या कधीं अकारण
वादळुनी ये अबोध हुरहुर
कुणी पांगळें पडतें रडतें
दूर वाहतें कुणिसें धूसर.

मनांत माझ्या कधिं कान्ह्याची
साद घालते मधुर पांवरी
धुक्यांत बुडला अस्फुटसा स्वन
वृत्तिगोपिका होइ बावरी.

मनांत माझ्या कुणी नर्तकी
धुंद नाचते तरल पैंजणीं
उकलवि कालिंदी जललहरी
कलाधराची शीळ लाजरी.

मनांत माझ्या कधीं लळ्लळे
शतजिव्हांनीं जळती ज्वाळा
जळून जातें माझें 'मी 'पण
मायेवरचा तवंग काळा.

मनांत माझ्या ब्रह्म जन्मतें
ब्रह्माण्डाचें बीज अंकुरे
मनांत माझ्या कधिं प्रलयांतुन
विश्वाचीं अन् उडतीं शकलें.

मनांत माझ्या कधीं उमलतें
ओंकाराचें चिर आवाहन
आणि सुषुम्नासोपानांतुन
कधि दे दर्शन चिदानंदघन.

मनांत माझ्या कधिं आत्म्यांतून
नचिकेत्याचा सजीव हो स्वर
ब्रह्माण्डाची भेदुन नाभि
प्रदीप्त आभा 'माझी ' ये वर.

—मधु वाबगांवकर








श्री. पु. का. ओक

# शिक्षणाची पुनर्घटना

भारताच्या केंद्रीय सरकारनें देशांतील माध्यमिक शिक्षणाची पुनर्घटना करण्यासाठीं पूर्वतयारी म्हणून, मद्रास विद्यापीठाचे कुलगुरु श्री. ए. लक्ष्मणस्वामी मुदलियार यांच्या अध्यक्षतेखालीं एक समिति नेमली. तिनें एक जंगी प्रश्नपत्रिका तयार करून, ती देशांतील शिक्षणक्षेत्रांत काम करणाऱ्या निरनिराळ्या संस्था व व्यक्ती यांच्याकडे पाठवून त्या पत्रिकेला उत्तरें मागविलीं व निरनिराळ्या संस्था-चालकांच्या, सरकारी अधिकाऱ्यांच्या व शिक्षणाशीं संबद्ध असलेल्या व्यक्तींच्या तोंडी साक्षी घेत घेत ती समिति फेब्रुवारी ७ ते ९ पुण्यास मुक्काम करून होती. येथेंहि अनेकांच्या साक्षी झाल्या. पण साक्षीकरितां वेळ इतका थोडा असतो कीं, त्या वेळीं कोणतीहि एखादी योजना सविस्तरपणें तोंडीं मांडणें अशक्य होतें. महाराष्ट्र-अध्यापक-संघटना या संस्थेतर्फें मी साक्षीसाठीं गेलों असतां हाच अनुभव मला आला. असो. समितीपुढें सूत्ररूपानें मांडलेले विचार थोड्याशा विस्तारानें प्रस्तुत लेखांत मांडले आहेत.

### अन्न–वस्त्र–निवारा–शिक्षण

स्वातंत्र्योत्तरकालांत शिक्षणाची पुनर्घटना ह्याला एक निराळा अर्थ आहे. समितीनें काढलेल्या प्रश्नपत्रिकेंत, शिक्षणाची आमूलाग्र पुनर्घटना करावयाची आहे म्हणून ह्या प्रश्नपत्रिकेला जन्म दिला गेला आहे असें आरंभींच म्हटलें आहे, आणि म्हणून पुनर्घटना म्हणजे काय याचा सांगोपांग विचार होणें अवश्य आहे. भारतीय घटनेनें आपल्या सुपुत्रांना शिक्षण मिळण्याचा हक्क बहाल केला आहे. त्याची अंमलबजावणी करणें प्रचलित सरकारचें कर्तव्य ठरतें. हें कर्तव्य बजावीत असतांना त्या सरकारवर कांहीं परिस्थितीच्या मर्यादा येतात. त्या मर्यादेंत राहून सर्वांच्या शिक्षणाची योग्य सोय करणें म्हणजे तारेवरील नाच आहे. पण तो करणें नुसतें इष्टच नव्हे तर आवश्यकहि आहे. आपणांस ह्या देशांत लोकशाही नुसती स्थापावयाची नाहीं तर ती सुस्थिर करावयाची आहे व तिचा आविष्कार जनतेच्या दैनंदिन जीवनांत प्रतीत झाला पाहिजे असें आपण म्हणतों. ह्या इष्ट गोष्टीचा पाया सुजाण नागरिक हा आहे. सुजाण नागरिक सुशिक्षणानें होणार आहे. त्याकरितां शिक्षणास सुरुवात व्हायला हवी. म्हणून शिक्षणाकरितां खर्च होणाऱ्या पैशाकडे व्यापारी वृत्तीनें पाहून चालणार नाहीं. नागरिकजीवन सुखी करण्याचा पाया सुशिक्षणानें भरून काढल्याशिवाय भागणार नाहीं. सरकारनें अन्नाकडे जितक्या तत्परतेनें, आस्थेनें लक्ष द्यावयास पाहिजे तितक्याच तत्परतेनें व आस्थेनें शिक्षणाकडे द्यावयास हवें. एवढेंच नव्हे तर, माणसाच्या अन्न, वस्त्र व निवारा ह्या मूलभूत गरजांनंतर शिक्षणाचाच क्रम लागला पाहिजे. पण ह्या प्राथमिक गरजा व शैक्षणिक गरज यांत एक मुख्य फरक आहे. प्राथमिक गरजा पुरविण्यासाठीं सरकारला फारशी तोशीस लागत नाहीं. पण शैक्षणिक गरज पुरवितांना सरकारला पैशाची काळजी करून भागणार नाहीं. समाजाचा प्रत्येक घटक आपल्या बौद्धिक कुवतीप्रमाणें त्या समाजाच्या चौकटींत चपखल बसला तरच त्या समाजाचें स्थैर्य बराच काल अबाधित राहील असें वाटतें. म्हणून शिक्षणाचें ध्येय व साधना ठरवितांना सामाजिक स्थैर्याची कल्पना लाथाडून चालणार नाहीं. जो सुशिक्षित नागरिक समाजाला भार न होतां, डोळसपणें आपले स्वतःचे व्यवहार चालवितो व त्याच डोळसपणानें आपली सामाजिक व राष्ट्रीय जबाबदारी पार पाडतो त्यालाच नागरिक म्हणतां येईल व त्यालाच आपले हक्क अविरोध उपभोगतां येतील. असा सुशिक्षित नागरिक निर्माण करणें हें शिक्षणाचें ध्येय असलें पाहिजे. अशा शिक्षणाचा आज आपणास विचार कर्तव्य आहे.

### शिक्षणाच्या पुनर्घटनेंतील पायऱ्या

त्याकरितां नव्या शिक्षणांत ज्या पायऱ्या असाव्यात असें वाटतें त्या खालीलप्रमाणें :

( विद्यार्थ्यानें सर्व वर्षांत केलेल्या कामाच्या नोंदीवरून त्याची वरच्या वर्गांत भरती करावी. )








# शिक्षणाची पुनर्घटना

| शिक्षणक्रम | वय | वर्षे |
|---|---|---|
| १. प्राथमिकपूर्व | ३+ ते ६+ | तीन |
| २. कनिष्ठ प्राथमिक | ६+ ते १०+ | चार |
| ३. वरिष्ठ प्राथमिक | १०+ ते १३+ | तीन |
| ४. कनिष्ठ दुय्यम | १३+ ते १५+ | दोन |
| ५. उच्च दुय्यम | १५+ ते १९+ | चार |
| ६. विद्यापीठ पदवी | १९+ ते २१+ | दोन |

७. विद्यापीठसंशोधन वय २१ नंतर जरूर तेवढीं वर्षे.

वरील शिक्षणाचा अभ्यासक्रम, त्यांतील विषय, त्याचा अभ्यसनीय भाग यांची उभारणी प्रत्यक्ष प्रायोगिक अनुभवावर करावी. हे प्रयोग करण्याचें कार्य राज्यांतील ट्रेनिंग संस्थांवर सोंपवून ठरविलेल्या मुदतींत त्यांनीं आपल्या प्रयोगांचीं अनुमानें पुढें सुचविलेल्या समितीच्या स्वाधीन करावीं. अशा प्रकारचे प्रयोग आपणाकडे झाले असतील तर ते फारच तुरळक व एतद्देशीय. त्यांचा पुढील मार्गदर्शनाच्या कामीं उपयोग होणें कठीणच.

खेड्यांतील व शहरांतील अभ्यासक्रमांत फरक असूं नये. फक्त वैकल्पिक विषयांची संख्या वाढवावी व त्यांत खेड्यांच्या परिसरांत आवश्यक अशा विषयांचा समावेश करावा. खेड्यांतील लोकांना आपल्याला शहरापेक्षां निराळें व कमी प्रतीचें शिक्षण दिलें जातें असें वाटतां कामा नये. खेड्यांतील मुलांकरितां स्वतंत्र अशा शेतकी शाळा काढण्याची जरूरी नाहीं. फक्त शाळांची वेळ अशी असावी कीं, ज्या वेळीं मुलगा अगर मुलगी आपल्या आईवडिलांना शेतीच्या कामांत मदत करीत नसेल. वास्तविक शेतीचें शिक्षण त्याला घरीं आपल्या आईवडिलांकडून मिळतेंच. त्यांना मदत व्हावयास हवी हें तर खरेंच; पण ही मदत शाळेकडून मिळविण्याऐवजीं ती शेतकी खात्याकडून मिळावी.

देशांतील प्रत्येक मूल ह्या शैक्षणिक शिडीनें शेवटपर्यंत जाणें हें आज तरी शक्य नाहीं. पण चरितार्थाकरितां त्याला शाळा सोडावी लागली तरी त्याचें शिक्षण थांबूं नये. त्याच्या विश्रांतीच्या वेळीं आपल्या आवडीचा अभ्यासक्रम यथावकाश पुरा करण्याची सवड व सोय त्याला उपलब्ध करून दिली पाहिजे. सांस्कृतिक ( Liberal ) शिक्षणाबद्दलचें आकर्षण बहुजन-समाजाच्या मनावर पक्कें बिंबलें असल्यामुळें तें शिक्षण त्याला सहजपणें घेतां येईल अशी व्यवस्था करावी लागेल. कारखान्यांतील मजूर, शेतीवरील शेतकरी, बाजारांतील हमाल, दुकानांतील नोकर, ह्यांपैकीं प्रत्येकाला शिक्षण मिळविण्याचा आपल्या राज्यघटनेनें प्राप्त झालेला अधिकार व्यवहारांत त्याच्या पदरीं पडला पाहिजे. नाहींपेक्षां त्या अधिकाराला कांहीं अर्थ उरणार नाहीं.

या सर्व शिक्षणक्रमांत सामाजिक कार्याकरितां खुषीची सक्ती झाली पाहिजे. प्रसंगोपात्त विद्यार्थ्यांच्या सामूहिक छावण्या घेण्यानें हें कार्य खुषीच्या सक्तीनें करून घेतां येईल. विद्यार्थ्यांना सार्वजनिक कार्याची विलक्षण हौस असते. ही हौस योग्य तऱ्हेनें कारणीं लावली तर त्यांना फार मोठें शिक्षण मिळेल. सहवास व सहजीवन ह्यांनीं त्यांचें पुढील जीवन अधिक समृद्ध होण्याची शक्यता निर्माण करतां येते, ह्याचा अनुभव पाश्चात्यांनीं आपणांस दिला आहे.

### शिक्षणाचें माध्यम

नवीन शिक्षणाचें माध्यम विद्यार्थ्यांची मातृभाषा असावी हा वादाचा मुद्दा खरोखर असूंच नये. परंतु आमच्याकडील विद्वान्, शिक्षणतज्ज्ञ व उच्चपदस्थ अधिकारी तिला दुय्यम शिक्षणांत आणण्यासुद्धां विरोध करतात. मग विद्यापीठांत तिला मज्जाव करण्याचा त्यांच्या लेखीं प्रश्नच येत नाहीं ! पण इतर सर्व देशांतील शिक्षणाशीं येथील शिक्षणाची तुलना करतां तें कमी प्रतीचें असतें ह्या बोलण्यांत असलेलें तथ्य कोणाच्या कारवाईचें फळ आहे, ह्याचा आज विचार करण्याचें कारण नाहीं. तथापि, मातृभाषेंतून सर्व शिक्षण दिल्यामुळें, उच्च शिक्षणक्रम अधिक भरीव करतां येईल ह्याबद्दल दुमत असूं नये. गेल्या जानेवारींत मुदलियार समितीपुढें महाराष्ट्र-अध्यापक-समितीच्या वतीनें साक्षीला गेलेल्या शिष्टमंडळानें ही गोष्ट ठासून मांडली. परंतु मुदलिआर-समितीच्या चिटणिसांनीं आपल्या कक्षेबाहेर हा प्रश्न आहे असें म्हणून त्याला








बगल दिली. तथापि, तेवढ्यावरच भागलें नाहीं. सबंध शिक्षणाचाच मौलिक दृष्ट्या फेरविचार करावयाचा असा उद्देश मुदलियार समितीनें पाठविलेल्या प्रश्न-पत्रिकेच्या उपोद्‌घातांत नमूद केला असल्यामुळें, मातृभाषेच्या माध्यमाचा उपयोग विद्यापीठ-शिक्षणांतहि झाला पाहिजे, असा दावा शिष्ट-मंडळानें केला. मातृभाषेच्या माध्यमाविरुद्ध–विद्या-पीठीय अभ्यासक्रमांत का होईना– जे कोणी उभे राहतात त्यांना एक साधा प्रश्न विचारावासा वाटतो कीं, जगांत इंग्रजी मातृभाषा नसलेले अनेक देश आहेत, त्या सर्वांनीं आपल्या विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत कोणत्या भाषेच्या माध्यमाचा उपयोग केला आहे? ह्या बाबतींत पाठ्यपुस्तकाची सबब नेहमीं पुढें केली जाते. पण एकदां मातृभाषा-माध्यमाचा पुकारा होऊं द्या कीं, एका वर्षांत अशीं पाठ्यपुस्तकें तयार होतील. कदाचित् मातृभाषा आज एवढी सबळ व समृद्ध नसेल; पण ही तिची वाढ व तिचा विस्तार माध्यमाच्या पदावरून तिला हांकलून लावण्यानें कसा होणार? पुढें-मागें मातृ-भाषाच माध्यम म्हणून करावी लागेल; पण आज नको म्हणणारांनीं अशीं कोणतीं सबळ कारणें पुढें केलीं आहेत? जें उद्या करावें लागेल त्या बाबतींत तसेंच कांहीं सबळ कारण असल्याशिवाय चालढकल करणें सबंध राष्ट्राच्या दृष्टीनें इष्ट नाहीं.

## भाषा किती?

ह्यानंतरचा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे सबंध शिक्षण-क्रमांत विद्यार्थ्यानें किती व कोणत्या भाषा सक्तीनें शिकाव्या आणि किती व कोणत्या भाषा विकल्पा-(option)नें शिकाव्या?–सबंध प्राथमिक (७ वर्षें) अवस्थेंत विद्यार्थ्याला मातृभाषाच चांगली शिकवावी व ह्याच भाषेचें शिक्षण विद्यापीठीय शिक्षणक्रमांत अन्तर्भूत करावें. भारताची राष्ट्रभाषा म्हणून हिंदीला दुय्यम शिक्षणाच्या अवस्थेंत सुरुवाती-पासून स्थान द्यावें. भाषांच्या बाबतींत एवढीच सक्ती असावी. विद्यापीठांत हिंदीला स्थान असावें पण तें विकल्पानें. ह्यानंतर इंग्रजी, संस्कृत, इतर भारतीय व पाश्चात्य, पौर्वात्य वर्तमान भाषा यांना दुय्यम शिक्षणाच्या शेवटच्या चार वर्षांत व विद्या-पीठांत विकल्पानें स्थान असावें. आजचा शिक्षणक्रम भाषाबाहुल्याखालीं दडपला आहे असें पुष्कळांचें मत असतांनाहि कांहीं लोक इंग्रजीची सक्ती व कांहीं संस्कृतची सक्ती करूं इच्छितात. त्याला ते कारणेंहि देतात. पण अभ्यासक्रमांतील भाषांचें वर्चस्व कमी करावयाचें तर सक्तीच्या भाषांची संख्या कमी करून भाषा शिक्षणाची ज्यांना निसर्गतःच आवड नाहीं त्यांच्यावरील भाषांचा बोजा विकल्पानें दूर करणें हाच मार्ग उरतो व हाच हेतु वरील सूचनांत आहे. ज्यांना इंग्रजीचा अभ्यास करावयाचा आहे त्यांनीं तो उशिरा सुरू करावा असें वरील सूचनेवरून स्पष्ट होईल. शाळेंतील मुलांचा समज वयाबरोबर वाढतो. मातृभाषेचा पाया (प्राथमिक ७ वर्षें व दुय्यम २ वर्षें) पक्का व विस्तृत झाल्यावर इंग्रजी भाषेसारखी सर्वस्वीं परकी भाषा मातृभाषेच्या तुलनेनें व चिकित्सक बुद्धीनें विद्यार्थ्यास शिकतां येईल व थोड्याच वेळांत ती जरूरीपुरती आत्मसात् करतांहि येईल.

## जीवनाभिमुख शिक्षण

अस्तित्वांत असलेल्या शिक्षणावर आज आणखी दोन आक्षेप आहेत, ते नवीन शिक्षणां-तून काढून टाकले पाहिजेत. एक म्हणजे आजचें शिक्षण जीवनाभिमुख नाहीं व दुसरा, निरनिराळ्या बौद्धिक शक्तींच्या, निरनिराळ्या आवडी-निवडींच्या विद्यार्थ्यांना एकाच चाकोरींतून जावें लागतें. दुसरा आक्षेप नाहींसा करावयाचा तर कांहीं वर्षें सर्व विद्यार्थ्यांना एक शिक्षणक्रम द्यावा. त्यानंतर त्यांच्या आवडीनिवडी व बौद्धिक कुवत ह्यांना धरून त्याला आवडेल व झेपेल असा व्यावसायिक, बौद्धिक, कलाविषयक, सांस्कृतिक यांपैकीं कांहीं अभ्यासक्रम घेऊन त्यांत त्यानें पारं-गतता मिळविण्याची सोय निर्माण करून ठेविली पाहिजे. त्यांनीं हा अभ्यासक्रम कसा निवडा-वयाचा व त्यांना ह्या कामांत कोणीं व कशी मदत करावयाची हें ठरवून ठेवलें पाहिजे. शाळेचे शिक्षक, मुलांचे पालक व सरकारचे शिक्षण-क्षेत्रांतील अधिकारी ह्यांच्या समितीनें सहविचारानें वरील बाबतींत निर्णय घ्यावयाचा असें ठरविलें, तरी त्यांच्या निर्णयाला कांहीं आधार लागणारच. त्या बाबतींत आपणास नवीन साधनें निर्माण केलीं








पाहिजेत. आजहि आपण विद्यार्थ्यांनीं निरनिराळ्या वर्षींच्या वार्षिक व इतर परीक्षांतून निरनिराळ्या विषयांत मिळविलेल्या गुणांची नोंद करतों. परंतु हीं गुणपत्रकेंच नुसतीं आपल्या उपयोगी पडणार नाहींत. त्याबरोबरच त्यांच्या बौद्धिक वाढीची, त्यांच्या आवडीनिवडींची, त्यांच्या शालेय वर्तनाची, त्यांच्या घरच्या अभ्यासाची, त्यांच्या घरच्या परिस्थितीची, त्यांच्या खेळाच्या प्रगतीची, क्रीडांगणावरील त्यांच्या वर्तनाची, ह्या सर्व गोष्टींच्या नोंदी व गुणपत्रकें ह्यांच्या साह्यानें त्या विद्यार्थ्यांनीं पुढें कोणता अभ्यासक्रम घ्यावयाचा हें वर सुचविलेल्या समितीनें ठरविल्यास, विद्यार्थ्यांना आपल्या आवडीचा अभ्यासक्रम मिळेल. तो पुरा करण्याकरितां ते पराकाष्ठा करतील. त्यामुळें त्या अभ्यासक्रमाला खोली प्राप्त होईल. इतर देशांतील अभ्यासक्रमाचा दर्जा त्याला मिळेल.

हा आक्षेप दूर केला तर त्यामुळें आणखी एक नवाच आक्षेप ह्या अभ्यासक्रमावर येईल: पुस्तकी अभ्यासक्रमांतून पार पडल्यावर आज तो बेकार होतो. पण वरील अभ्यासक्रमांतून पार पडल्यावर तो बेकार होणार नाहीं का? समाजांत आज जितके सुतार, लोहार, वकील, डॉक्टर आहेत ते सगळे व्यवस्थितपणें आपला व आपल्या कुटुंबियांचा चरितार्थ चालवीत आहेत काय? जर नसतील तर उद्यां ह्यांच्याच जातीचे लोक प्रचंड प्रमाणावर निर्माण होऊं लागले तर त्यांची काय, कशी व कोण सोय लावूं शकणार आहे?

पण हा नवीन आक्षेप व आपण वर जे दोन आक्षेप घेतले त्यांपैकीं पहिला, हे दोन्ही जवळ-जवळ एकाच प्रकारचे आहेत, म्हणून त्यांच्याबद्दल एकाच वेळीं विचार करणें चांगलें व सोयीचें होईल. आजचें शिक्षण जीवनाभिमुख नाहीं असा आक्षेप आहे. ह्याचा अर्थ काय? ह्याचें एकदम उत्तर द्यावयाचें तर तें असें कीं, तें शिक्षण पुस्तकी आहे. व्यवहारांत त्याचा कारकुनीशिवाय दुसरीकडे मुळींच उपयोग नाहीं. पण कारकुनीकरितां जें शिक्षण सुरू झालें त्याचा दुसरा उपयोग झाला नाहीं असा आक्षेप घेण्यांत तथ्य नाहीं. शिवाय सुरुवातीस शिक्षण घेणारे फार थोडे. त्यांतील परीक्षेच्या लायकीच्या कसाला उतरणारे त्याहून थोडे. पूर्वी कारकुनी मिळणें फार सोपें होतें, एवढेंच नव्हे तर, इंग्रजी तीन-चार बुकें शिकून तयार झालेले विद्वान् पूर्वी मामलतदाऱ्या मिळवीत असें एका पिढीपूर्वीचे लोक आजहि दिमाखानें सांगतात, त्यांत खोटें मुळींच कांहीं नाहीं. नंतर देशभक्तीची लाट आली. शिक्षण देणारे देशभक्त पुढें आले, त्यांनीं स्वार्थत्यागपूर्वक शिक्षणसंस्था चालविल्या. पण त्यांनीं अभ्यासक्रम, क्रमिक पुस्तकें घेतलीं तीं मात्र सरकारमान्य. म्हणजे त्यांनीं शिक्षणाची चाकोरी बदलली नाहीं. ह्याला कारणें अनेक आहेत. त्या कारणमीमांसेंत जाण्याचें हें स्थळ नव्हे व तो आपला विषयहि नाहीं. तेव्हां सुरू झाल्याकाळीं हें शिक्षण जीवनाभिमुख होतें कीं नाहीं असा प्रश्न कोणीं उद्भूत केला तर त्याला नकारार्थी उत्तर देणें जड जाईल! शिक्षितांना नोकऱ्या मिळाल्या, चांगल्या नोकऱ्या मिळाल्या, त्यांच्या चरितार्थाचा प्रश्न सुटला. आपण असें म्हणूं या कीं मागच्या शिक्षणानें कारकुनांच्या पोटापाण्याचा प्रश्न सुटला व तेवढ्याच मर्यादित अर्थानें तें शिक्षण जीवनाभिमुख होतें. पण एकंदर लोकसंख्येशीं लागणाऱ्या कारकुनांचें प्रमाण फारच अल्प असणार. इतर शिक्षित लोकांच्यापुढें बेकारी 'आ' वासून उभी राहील त्याचें काय करावयाचें हा प्रश्न सोडवावाच लागेल. मग मात्र ह्या प्रश्नाचें सारें रूप बदलेल. सर्वांना—म्हणजे लायक त्या सर्वांना—म्हणजेच वरील शिक्षणक्रमांतून यशस्वी होऊन बाहेर पडलेल्या सर्वांना काम मिळालें पाहिजे, ते बेकार राहतां कामा नयेत अशी योजना आंखली पाहिजे. नाहीं तर पुस्तकी शिक्षणानें वाढलेली बेकारी इतर शिक्षणक्रमांतून बाहेर पडलेल्यांच्या बोकांडीं बसल्याशिवाय राहणार नाहीं. तथापि हा शिक्षणतज्ज्ञांच्या कक्षेंत येणारा प्रश्न नाहीं म्हणून तो तसाच सोडून चालणार नाहीं. त्याचाहि विचार करावयास हवा. राजकारणाच्या खोल पाण्यांत न शिरतां एवढेंच म्हणून ठेवावेसें वाटतें कीं, सामान्य माणसाच्या खिशांत चार दिडक्या अधिक पडल्या तर निर्मिलेल्या







जीवनोपयोगी वस्तू लोक अधिक विकत घेतील. त्यामुळें वस्तूंची बाजारांत अधिक मागणी वाढेल, त्या अधिक वस्तू तयार करणारे नवीन शिक्षणानें तयार होतील. असें चक्र एकदां सुरू झालें कीं त्याला आपली स्वतःची वाढती गति मिळून देशाची संपत्ति वाढेल. लोक अधिक सुखी होतील. आजचें दारिद्य नाहींसें होईल.

## सरकारी यंत्रणा

शिक्षण घेणारांची संख्या अतोनात वाढल्यामुळें त्याला सुयंत्रित ठेवण्याकरितां जी सरकारी योजना विद्याखात्याच्या रूपानें होती ती आज फार अपुरी पडते. सबंध मुंबई राज्याकरितां एक विद्याखातें एका प्रमुखाखालीं काम करतें. त्या खात्याची कांहीं विषयवार विभागणी व त्याकरितां प्रत्येकीं एक उपप्रमुख. त्याच्या हाताखालीं सबंध राज्याचे पांच भाग असून त्यावर एक मुख्य तपासनीस व त्याच्या मदतीला प्रत्येक जिल्ह्याला एक उपतपासनीस. शिक्षणाचें नियंत्रण, शाळांचें नियंत्रण या सरकारी योजनेनें घडवून आणतात. तथापि, राज्यांतील सर्व शिक्षणाचें नियंत्रण, मार्गदर्शन ह्या योजनेनें अर्थात् अपेक्षेप्रमाणें व योग्य तऱ्हेनें मुळींच साधत नाहीं असा आपला अनुभव आहे. आतां नुकतेंच जिल्हावार किंवा तत्सम भागांवर इन्स्पेक्टर नेमण्याचें सरकारनें जाहीर केलें आहे. त्यामुळें शैक्षणिक कारभाराच्या विकेंद्रीकरणास सुरुवात होत आहे हें खरें. पण या लेखांत पुढें सुचविलें आहे त्याप्रमाणें शिक्षणयंत्र लोकाभिमुख व लोकशाही झाल्याशिवाय, ही सुधारणा केवळ तांत्रिकच ठरेल. शिवाय, हल्लीं ज्या खासगी संस्था आहेत त्यांतील चालक आणि शिक्षक ह्यांच्यामधील दिवसेंदिवस रुंदावत चाललेली खोल दरी, इत्यादि गोष्टींचा विचार करतां शिक्षणाची पुनर्घटना करतांना तिचा पाया अगदीं निराळा घेतला गेला पाहिजे असें वाटतें.

खासगी शाळेंतील शिक्षक कोणत्याहि दृष्टीनें सुखी नाहीं. पगार पुरेसा नाहीं, नौकरीची शाश्वती नाहीं, म्हातारपणची विशेषशी सोय नाहीं, पोराबाळांच्या शिक्षणाची तोकडीच सोय! अशा परिस्थितीनें शिक्षक नागावलेला व गांजलेला आहे. त्याच्या धंद्याचा बडेजाव वेळीं-अवेळीं सभांतून, व्याख्यानांतून, वृत्तपत्रांतून केला जातो. राष्ट्राच्या आधारस्तंभ घडविणारा म्हणजे एका दृष्टीनें भाग्यविधाता म्हणून त्याचा उदोउदो केला जातो. पण प्रत्यक्षांत मात्र मालक व नौकर असे व्यापारी संबंध असतात. त्याचें दुर्दैव येथेंच थांबत नाहीं. नौकर म्हणून इतर धंद्यांत त्याला जें संघटनेचें संरक्षण असतें, त्याला जे अधिकार प्राप्त होतात ते मात्र शिक्षकाला मिळत नाहींत. असा कष्टी मनुष्य कसले राष्ट्राचे भावी आधारस्तंभ घडविणार? ही परिस्थिति बदललीच पाहिजे.

## जिल्हावार प्रातिनिधिक शिक्षण-समिति

आपण लोकशाहीच्या काळांत राहतों व लोकशाही सुप्रतिष्ठित करण्याचें कंकण आपण हातीं बांधलें आहे. म्हणून असें वाटतें कीं, शिक्षणांतहि लोकशाही आली पाहिजे आणि शिक्षणप्रांतांत ती दृढमूल झाली तर, इतरत्र ती तेंच स्थान घेईल. शिक्षणक्षेत्रांत लोकशाही आणण्याकरितां पुढील योजना सुचवावीशी वाटते : राज्यांत जेवढे जिल्हे तेवढे शिक्षणाकरितां सुटे सुटे भाग करावेत. प्रत्येक जिल्ह्याची एक स्वतंत्र शिक्षा-समिति असावी. त्या समितीच्या सभासदांची संख्या फार मोठी अगर फार लहान नसावी. पण ती प्रातिनिधिक असावी ह्यावर मात्र कटाक्ष असावा. शिक्षकांचे, सरकारचे व लोकांचे प्रतिनिधी निवडणूकपद्धतीनें त्या समितीवर यावेत. जितक्या प्रकारच्या शिक्षणसंस्था त्या जिल्ह्यांत असतील त्यांच्यांत समप्रमाणानें शिक्षकांच्या प्रतिनिधींची वांटणी झाली पाहिजे. त्याचप्रमाणें प्रत्येक जिल्ह्यांत जितके निरनिराळे उद्योगधंदे असतील त्यांत सामील होणाऱ्या लोकांचे सम प्रमाणांत प्रतिनिधी घ्यावेत. सरकारच्या प्रतिनिधींत असे सरकारी अधिकारी असावेत कीं, ज्यांचा संबंध जिल्ह्याच्या सर्व प्रकारच्या व सर्व थरांतल्या लोकांशीं आहे. अशा तऱ्हेनें तयार झालेली शिक्षण-समिति ही त्या जिल्ह्यापुरती सर्वोच्च शिक्षण-नियंत्रणाधिकारी राहील. शिक्षण-क्षेत्रांत तिचा निर्णय अखेरचा मानला गेला पाहिजे. प्रचलित सरकार ह्या बाबतींत तिला सर्वाधिकारी मानण्यास तयार









असलें पाहिजे. सबंध जिल्ह्यांत कसें शिक्षण द्यावयाचें, कोणतें द्यावयाचें, किती द्यावयाचें व कोणीं द्यावयाचें ह्या सर्व गोष्टींविषयीं आपला एक आराखडा सदरहू शिक्षण-समिति तयार करील व तो लोकांत प्रसृत करील; लोकांच्या टीका-प्रतिटीका ह्या सर्व विचारांत घेऊन जिल्ह्याच्या शिक्षणाचा एक पक्का खर्डा तयार करील व तो अंमलांत आणील. अर्थात् हें सर्व करण्यापूर्वी तिला जिल्ह्यांतील जनतेच्या जीवनाचें परिपूर्ण असें चित्र उपलब्ध झालें पाहिजे. त्या चित्राकरितां तिला बरीचशी माहिती आंकडेवार मिळाली पाहिजे. जिल्ह्यांतील जमिनीचा सारा, लोकल फंड, लोकल सेस, व्यापार, उद्योगधंदे, शेती, उत्पन्न, कर्ज, स्त्रिया, पुरुष, मुलें, साक्षरता, सहकारी संस्था, दवाखाने, पतपेढ्या, सावकार, कुळें, बागाईत व जिराईत जमीन, वनचराईसाठीं सोडलेली जमीन, पेरणीखालीं व उजाड जमीन, नद्या, ओढे, नाले, सरासरी पाऊस, धान्य-पिकें, व्यापारी पिकें, आयात-निर्यात व्यापार, गिरण्या, शेतीला उपयोगी गुरें, दुधाच्या उपयोगी गुरें, भाकड गुरें, गुरांचे रोग, फळाफुलांचे रोग, कारखाने, पक्के-कच्चे रस्ते, रेल्वे, उपजीविकेचीं साधनें, प्रत्येक खेड्यांतील सरासरी उत्पन्न, कारखान्यांतील व शेतावरील मजूर, बोलभाषा, सरकारी नोकर, निरनिराळ्या खासगी धंद्यांतील नोकर, नोकरांची वेतनश्रेणी, त्यांच्या नोकरीची शाश्वती—इत्यादि बाबतींत कसून आंकडेवार माहिती मिळविली पाहिजे. ह्या यादींत आणखीहि कांहीं आतां न सुचणाऱ्या गोष्टींचा समावेश करावा लागेल. ह्या सर्व गोष्टींची आंकडेवारी ह्या हेतूनें जमा करावयाची कीं, त्यायोगें सर्व जिल्ह्याचें, तेथील लोकांचें, त्यांच्या राहणीचें, त्यांच्या उद्योगांचें, त्यांच्या विश्रांतीचें, करमणुकीचें एक स्पष्ट व ठळक चित्र वरील समितीला सर्व लोकांपुढें उभें करतां येईल व ह्या लोकांच्या अभ्युदयाकरितां, त्यांचें जीवनमान उंचावण्यासाठीं, त्यांचें सांस्कृतिक जीवन सुधारण्यासाठीं किती व कोणत्या प्रकारच्या शिक्षणसंस्था निर्माण कराव्या लागतील, त्यांचे अभ्यासक्रम कसे व किती ठेवावे लागतील, त्याकरितां किती पैसा लागेल, त्याची सोय कशी करावी, ह्यांबद्दलचा सर्व आराखडा त्या शिक्षा-समितीला तयार करतां येईल. असा आराखडा लोकांच्यापुढें गेल्यानें लोकांत एक नवीन चैतन्य निर्माण होईल, शिक्षणाला जीवनांत एक महत्त्वाचें स्थान प्राप्त होईल. आवडीचा अभ्यासक्रम मिळाल्यानें एकपट उत्साह उत्पन्न झाला, तर 'जीवनांत त्या अभ्यासक्रमाला स्थान आहे, नुसत्या माझ्या जीवनांतच नाहीं तर माझ्या खेड्याच्या, तालुक्याच्या, जिल्ह्याच्या व राज्याच्या जीवनांत त्या शिक्षणक्रमाला स्थान आहे.' ह्याची जाणीव उत्पन्न होऊन ह्या जाणिवेनें तो उत्साह अनंतपट होईल. आणि असा उत्साह माणसाकडून काय करवून घेणार नाहीं !

---

## अश्रूंनो !—

अश्रूंनो, या मम नयनांमधिं
विश्वामधिं या अगाध येतां
अश्रूंनो, जा जननयनांमधिं
विश्वांतून या अगाध जातां !

—दत्त शंकर कुलकर्णी

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# स्टॅलिन : कम्युनिस्ट क्रान्तीचा कारागीर

"Perhaps truth is most profoundly manifested where the movement is characterized by the greatest upheaval." —Karl Jaspers

('मानवी आंदोलनास जेव्हां उच्चतम उद्रेकाचें स्वरूप प्राप्त होतें, बहुतेक तेव्हांच सत्याचा अत्यंत गंभीर आविष्कार होतो.')

कम्युनिझमनें उत्पन्न केलेल्या प्रश्नाचा निकाल लावणें, हेंच विद्यमान विश्वव्यापी मानवतावादी आंदोलनाचें उद्दिष्ट आहे. कम्युनिझमसंबंधाच्या लढ्यांत जगांतील सगळीं राष्ट्रें गुंतलीं आहेत. आजच्या जागतिक चळवळीचें एकमेव लक्षण, कम्युनिस्ट चळवळीच्या पृथक्करणाशिवाय, निश्चित करतां येत नाहीं. कम्युनिझमनें ज्या मूलभूत प्रश्नाकडे मनुष्यजातीचें लक्ष खेंचून घेतलें आहे, त्याचें उत्तर कम्युनिझममध्यें मिळतें कीं नाहीं, हाच वादग्रस्त मुद्दा आहे. परंतु कम्युनिझमनें त्या सर्वश्रेष्ठ व मूलभूत मूल्याकडे सर्व मानवजातीला आपलें लक्ष केंद्रित करावयास लावलें, यांत शंका बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. माणसाची माणसावरील आर्थिक, राजकीय व सांस्कृतिक सत्ता नष्ट कशी करतां येईल व समतेचें व व्यक्तिस्वातंत्र्याचें जीवन माणसास कसें निर्माण करतां येईल, असा तो प्रश्न आहे. या प्रश्नाचा निकष लावूनच क्रान्तीच्या चळवळींचें योग्य मूल्यमापन करतां येतें. कम्युनिझमच्या यशापयशाचाहि हाच निकष आहे.

वैज्ञानिक सत्य आणि मानवी ध्येयवाद यांची सांगड क्रान्तीच्या चळवळीला घालावी लागते. कम्युनिझमचा जरी वैज्ञानिक सत्यावर भर असला तरी तें वैज्ञानिक सत्य मानवी ध्येयवादाला संपूर्णपणें वाहून घेतलेलें आहे, असा दावा कम्युनिझमलाहि करावा लागतो. स्टॅलिनच्या क्रान्तीच्या कर्तृत्वाचें मूल्यहि वरील ध्येयवादास अनुसरूनच करावयास पाहिजे. कारण मूल्यमीमांसा करण्याचा मानदंड ध्येयवादच असतो. ध्येयवादाशिवाय मूल्यमीमांसा करणेंच अशक्य असतें.

## ऐतिहासिक भौतिकवादाचें मूर्तिमंत चैतन्य

स्टॅलिनच्या निधनानें जागतिक इतिहासांतील एक कालखंड समाप्त झाला. स्टॅलिन मेला, त्या क्षणीं मानवी जगात त्याच्याइतकी प्रभावसंपन्न व्यक्ति कोणी नव्हती. स्टॅलिन मेला, त्या क्षणीं आधुनिक जगाच्या समोरून एक उच्चतम वीर विभूति निघून गेली, असेंच एकदम निदर्शनास आलें. श्रेष्ठ विभूतिमत्ता ज्या राजकीय पुरुषांना आजपर्यंतच्या मानवी इतिहासांत आली आहे, त्यांच्यांत स्टॅलिनचें स्थान ध्रुवाइतकें अढळ राहील. तो अधिक जगला असता तर हें विधान करतां आलें असतें कीं नाहीं, हें मात्र सांगवत नाहीं. त्याला नेपोलियनसारखा पराभव मिळालाच नसता, असें म्हणवत नाहीं. स्टॅलिनच्या जीवनांतील सगळे पराजय त्याच्या विजयाच्या उत्तुंग पर्वतमालांनीं मानवाच्या दृष्टिपथाच्या आड झाले आहेत. त्याचें जीवन क्रांतिकारकाचें जीवन होतें. सन १९०२ पासून १९१७ पर्यंत सतत पंधरा वर्षें भडकलेल्या आगींत उभा राहून, झारच्या प्रचंड सत्तेशीं लढा देत तो उभा होता! अद्भुतरम्य साहसानें भरलेला रोमांचकारी लढ्याचा इतिहास, असें स्टॅलिनच्या चरित्राचें स्वरूप आहे. त्यांत त्याला किती तरी वेळां हार खावी लागली आहे. परंतु १९१७ सालानंतरचा क्रांतीच्या विधायक रचनेचा इतिहास यशाच्या अनेक धवलगिरींचा साक्षात्कार करून देतो.

स्टॅलिनच्या मृत्यूनंतर गोंधळ माजेल, सत्तेच्या स्पर्धेंतून यादवी निर्माण होईल, अशी आशा कम्युनिस्टविरोधी गट करीत आहेत. ही आशा खोट्या वासनेंतून निर्माण झाली आहे. वस्तु-







स्थितीच्या अज्ञानानें ही आशा उत्तेजित केली आहे. स्टॅलिनचें दीर्घकालपर्यंत पसरलेलें यशस्वी व प्रतापी कर्तृत्व न तपासल्यामुळें अशी खोटी आशा उत्पन्न झाली आहे ! संघटनाचातुर्य व वस्तुवादी वृत्ति हें स्टॅलिनच्या यशाचें एक महत्त्वाचें कारण आहे. अहंता आणि ममता यांची बाधा विवेकाला होण्याइतकें त्याचें मन दुर्बळ नव्हतें. प्रतापी समर्थांचें हें दौर्बल्य इतिहासप्रसिद्ध आहे. त्या दौर्बल्यामुळेंच त्यांना यशाचा उन्माद होतो, जगाचें नेतृत्व किंवा गुरुत्व प्राप्त झाल्याचा भास उत्पन्न होतो. अशा दौर्बल्यदर्शक मनोविकृतीची बाधा स्टॅलिनला झालेली नव्हती, म्हणून त्यानें आपल्या कर्तृत्वाचा मजबूत पाया रचला. 'माझ्यापाठीमागून काय होईल !' असा प्रश्नच त्याला पडला नाहीं. 'माझ्यापाठीमागून काय होणार आहे, हें मला पूर्ण माहीत आहे' असा निर्वाळा त्यानें चर्चिलला दिला होता. त्यानें दोन भक्कम संघटना आपल्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं निर्मिल्या. त्या म्हणजे प्रचंड पक्ष व विशाल एकजीव राष्ट्र. तो व्यक्तिशः हुकूमशहा होता. तो प्रथम क्रांतीचा शिपाई होता व नंतर क्रांतीचा सेनापति झाला. सशस्त्र क्रान्तीचा उठाव करण्याचें ध्येयच त्यानें जन्मभर जवळ बाळगिलें व वागविलें. त्यामुळें त्यानें पक्षाला लष्करी संघटनेचें स्वरूप दिलें आणि राष्ट्राला सैन्याचें शिबिर बनविलें. प्रत्येक गांव आणि शहर म्हणजे लढाऊ किल्ला बनला, प्रत्येक नागरिक सैनिक झाला. म्हणून पाश्चात्य संस्कृतीच्या राजकारणी प्रवृत्तीचें ऐकांतिक व प्रत्यक्ष निदर्शन म्हणजे सोव्हिएट रशिया होय, असें इतिहासशास्त्रज्ञांस म्हणावें लागेल. स्टॅलिनच्या मृत्यूनंतर गडबड व गोंधळ उडणार नाहीं, याची हमी स्टालिनचें व्यक्तिमत्त्वच देतें. स्टालिनच्या व्यक्तिमत्त्वाचें पृथक्करण करा, त्यांत ऐतिहासिक भौतिकवादाचें चैतन्य सांपडेल. हें चैतन्य ( spirit ) हेगेलच्या चैतन्यवादाचें मूर्तिमंत स्वरूप होय. मानवी इतिहासांत चैतन्य प्रचंड राज्यशक्तीच्या रूपांत प्रकट होतें, असा इतिहासवाद हेगेल सांगून गेला. हेगेलला असा भास झाला कीं, जर्मन राज्य हेंच तें चैतन्याचें मूर्तिमंत रूप होय. तो भास होता. स्टॅलिननें निर्माण केलेलें सोव्हिएट राज्य हें मात्र चैतन्याचें साकार रूप होय, असें हेगेलच्या ऐतिहासिक तत्त्वज्ञानाप्रमाणें म्हणतां येतें. कार्ल मार्क्सच्या कम्युनिझमचें मात्र हें स्वरूप नव्हे. त्यांत व्यक्ति पूर्ण स्वतंत्र असते. स्टॅलिनच्या सोव्हिएट यूनियनमध्यें व्यक्ति ही राज्यास समर्पित आहे व राज्य हें पक्षास समर्पित आहे. तेथें पक्षाची हुकूमशाही अनिर्बंधपणें नांदत आहे. म्हणून स्टॅलिननंतर काय होणार ही शंकाच अस्थानीं आहे

## स्वतःस विभूति न समजणारी विभूति !

स्टॅलिन ही या शतकांतील अद्वितीय राजकीय विभूति होय, ही गोष्ट विभूतिवादी इतिहासकारानें तर मान्यच केली पाहिजे. मी स्वतः विभूतिवादी नाहीं किंवा विभूतिपूजकहि नाहीं. कारण माझें असें मत आहे कीं, प्रत्येक महान् ऐतिहासिक घटनेला जन्म देण्याकरितां विभूति लागतेच असें नाहीं. विशिष्ट विभूतींवाचूनहि इतिहासाचीं श्रेष्ठ सामर्थ्यें प्रकट होतात. विविध क्षेत्रांत अगणित कर्तृत्वशाली व्यक्तींच्या सामुदायिक तेजानेंहि मानवी कालखंड तेजस्वीपणानें तळपत असलेले इतिहास दाखवितो. परंतु कित्येक वेळां विलक्षण विचारसामर्थ्याच्या व्यक्तींनाहि इतिहासांत अलौकिक स्थान लाभतें. कित्येकदां इतिहासच अशा व्यक्तींना निर्माण करतो. सोव्हिएट यूनियनच्या इतिहासानें अशी अद्वितीय व्यक्ति प्रकट केली आहे, हें मात्र नाकारतां येत नाहीं.

स्टॅलिन स्वतःस विभूति समजण्याइतका भाबडा अथवा अहंकारी नव्हता. भावनांच्या भ्रमांत न सांपडणारें पोलादी व्यक्तित्व त्याच्या ठिकाणीं होतें. त्याला देव किंवा सैतान मानणाऱ्या माणसांबद्दल तो मनांतल्या मनांत कींव करीत असेल ! ट्रॉट्स्की हा मानवी इतिहासांत नाणावलेल्या उच्चतम वक्त्यांमध्यें गणला जातो; त्याची लेखनशैलीहि श्रेष्ठ प्रतीची आहे; व त्याबद्दल त्याला खूप अस्मिता व घमेंडहि होती. तो या आपल्या गुणांमुळें सामान्य माणसांना तुच्छ लेखीत होता. ट्रॉट्स्कीची ही सामान्य माणसांना तुच्छ लेखण्याची प्रवृत्ति स्टॅलिननें ओळखली.








म्हणूनच तो ट्रॉट्स्कीबद्दल घृणा बाळगीत होता. स्वतःस विभूति न समजणारी अशी विद्यमान जगांतील अद्वितीय विभूति, असें स्टॅलिनचें वर्णन करतां येईल. स्टॅलिनला सैतानाच्या किंवा दैत्य-दानवांच्या कोटींत गणणारे अनेक विचारवंत आहेत ! त्यांना स्टॅलिनचें मनुष्यत्व ओळखतां येत नाहीं. याचें कारण, स्टॅलिन हा क्रान्तीचा प्रणेता होता, या कल्पनेचा त्यांना अर्थ समजत नाहीं, हें होय. इतिहासाच्या तत्त्वज्ञानांत हेगेलनें मुद्दाम बजाविलें आहे कीं, जे पुरुष मोठ्या ऐतिहासिक घटनांचे जन्मदाते असतात, त्यांना सर्वसामान्य माणसांना लागू पडणारें नीतिशास्त्र लागू करणें चूक होय. त्यांनीं उभारलेलीं राज्यें किंवा संस्था किंवा महान् चिरंतन कृती त्यांच्या हातून झालेल्या प्रमादांचें परिमार्जन करणाऱ्या पुण्य-राशीच बनतात; मानवी नैतिक जीवनाच्या सत्त्वांशाच्याच त्या राशी होत. हेगेलनें प्रतिपादिलेल्या त्या दृष्टिकोनावरून स्टॅलिनचें समर्थन होऊं शकतें. दुसरें असें कीं, महाकाव्यें आणि श्रेष्ठ ऐतिहासिक घटनांचे इतिहास ज्या प्रकारच्या शूर विभूतींचें वर्णन करतात त्या प्रकारांत स्टॅलिनचा समावेश होऊं शकतो, ही गोष्ट तटस्थ बुद्धीच्या विवेचकास मान्य करावी लागते. विभूतीच्या श्रेष्ठतेबद्दल तीव्र मतभेद होणें हें अत्यंत स्वाभाविक आहे. क्रान्तीच्या स्वभावांतच या तीव्र मतभेदाला पोषक असलेली भूमिका भरलेली आहे. क्रान्ति ही तीव्र संग्रामावस्थेचीच परिणति होय. जुन्या बाधक व संकुचित सामाजिक हितसंबंधांचा संहार करणें आणि नवे सर्वसाधारण व्यापक सामाजिक हितसंबंध निर्माण करणें हा क्रान्तीचा कार्यक्रम असतो. क्रान्तीच्या इष्टतेबद्दल परस्परविरोधी असलेले सिद्धांत प्राज्ञांनीं सांगितलेले दिसतात. क्रान्तीशीं संबंध नसलेले परंतु इतिहासप्रसिद्ध अथवा पुराणप्रसिद्ध राज्यधारी पुरुषदेखील मतभेदाचा विषय बनतात. राजनीतीची वक्रता, कुटिलता अथवा सामान्य नैतिक तत्त्वांबद्दलची बेफिकीरी हीं पौर्वात्यांच्या व पाश्चिमात्यांच्या राज्यशास्त्रांत मशहूर आहेत. म्हणून राजनैतिक महत्पदास प्राप्त झालेल्या व्यक्ती साधुत्वाच्या सुप्रसिद्ध कसोटीस क्वचितच उतरतात. रामचरित्रहि यास अपवाद नाहीं हेंहि येथें ध्यानांत ठेवणें आवश्यक आहे.

### राष्ट्रवादाचा मागच्या दारानें प्रवेश

कम्युनिझम ही मानवव्यापी आंतरराष्ट्रीय विचारसरणी व चळवळ आहे. राष्ट्रवादाच्या संकुचित भावनांशीं या विचारसरणीचा खास विरोध आहे. या आंतरराष्ट्रीय चळवळीला पहिल्या महायुद्धाच्या अखेरीस रशियांत राहण्यास घर मिळालें. परंतु रशियासारखें आधुनिक औद्योगिक क्रान्तींत मागसलेलें राष्ट्र हें कम्युनिझमचें अपेक्षित घर नव्हे. औद्योगिक क्रान्तींत पुढारलेलें भांडवलदारी राष्ट्रच कम्युनिस्ट क्रान्तीचें खरें जन्मस्थान होय, तेथेंच कम्युनिस्ट क्रान्ति जन्मास येण्यास आवश्यक अशी सामाजिक परिस्थिति परिणतीस पावलेली असते, असा मार्क्स व लेनिन यांचा सिद्धान्त होता. ' जर्मनीसारख्या सुधारलेल्या देशांतील क्रान्ति हातीं येत असेल तर रशियन क्रान्तीचा हात सोडण्यासहि मी तयार होईन ' असें लेनिन म्हणत असे. मार्क्सवादानें ठरविलेली तत्त्वपद्धति व ऐतिहासिक क्रम उल्लंघून कम्युनिस्ट क्रान्तीनें रशियासारखा मागसलेला देश आश्रयास घेतला. तत्त्वपद्धति आणि वस्तुस्थिति यांच्या विरोधांतून मार्ग काढणें हेंच मोठें बिकट काम क्रान्तिकारकांच्या पुढें उभें राहिलें. हें एक मोठें व्यावहारिक कोडें होतें ! रशियांतील आर्थिक शक्ति दुबळी होती, कामगारवर्ग बेकारींत व हलाखींत दिवस काढीत होता, जनतेचें जीवनमान अगदीं आजच्या खालच्या पातळीवर खिळलेलें असून भकास बनलें होतें. म्हणून १९१७ सालीं झालेली क्रान्ति सात-आठ वर्षांच्या आंत निरुत्साही बनली. लेनिन परलोकवासी झाला होता. आंतरराष्ट्रीय क्रान्तीच्या आशा मावळल्या होत्या. जर्मनींत एवढ्या अवधींत तीन वेळां कामगार-क्रान्तीची संधि आली परंतु स्फोट होण्याच्या आधींच तिला ओहटी लागली. क्रान्तीच्या पराभवाचाच इतिहास युरोपियन रंगभूमीवर नृत्य करूं लागला. स्टालिननें हें सर्व ओळखलें. तत्त्वांचा व आंतरराष्ट्रीय क्रान्तीचा घोष करीत क्रान्तीचे प्राण कंठाशीं आलेले त्यानें










पाहिले. म्हणून त्यानें क्रान्तीची मर्यादा ध्यानांत घेतली. ' एकाच देशांतहि समाजवाद ' स्थापतां येतो, या विचाराचें सूत्र त्यानें रशियांतील कम्युनिस्ट पक्षाला शिकविलें. जगांत अन्यत्र क्रान्ति फैलावण्याच्या प्रयत्नांत माहेरघरची स्वदेशांतली क्रान्ति पराभूत व्हावयाची, म्हणून जागतिक क्रान्तीचा उठाव होण्याची संधि बघत बसण्यांत अर्थ नाहीं, असें त्यानें ठरविलें.

स्वराष्ट्राच्या सीमामंडलांतच क्रांतीला दृढमूल करावयाचें व वाढवावयाचें हें ठरल्यावर राष्ट्रवादाशीं जुळतें घेण्याची कामगिरी स्टालिनला करावी लागली. राष्ट्रवाद कम्युनिझमच्या गोटांत मागच्या दारानें शिरला ! रशियन देशाभिमान पुनः जागृत करण्याचें काम राष्ट्रभेदांच्या मर्यादा न ओळखणाऱ्या व सर्व जग एक समजणाऱ्या कम्युनिस्ट पक्षाच्या कपाळीं आलें. पूर्वजपूजा, परंपरेचा अभिमान, राष्ट्रीय वीरांचें गुणगान, राष्ट्रीय इतिहासाची कृत्रिम रचना इत्यादि प्रतिगामी म्हणून धिक्कारलेलीं अंगें कम्युनिस्टांनीं रशियांत अंगिकारिलीं. राष्ट्रवादाच्या या संकुचित भावनेचा पुनरुद्धार जरी स्टालिन करीत होता, तरी त्यानें आंतरराष्ट्रीय कम्युनिझमची चळवळ या रशियन राष्ट्रवादाच्या दर्पापासून दूर ठेविली. हें सर्वांत अवघड, किंबहुना अशक्य कार्य स्तालिनला करून दाखवितां आलें. या बाबतींत आंतरराष्ट्रीय कम्युनिझमची चळवळ मात्र संधिसाधु व तत्त्वच्युत झाली. भांडवलशाहीचीं साम्राज्यें उलथून टाकण्यास त्या त्या राष्ट्रांतील प्रतिगामी राष्ट्रवादांना भडकविण्याचें काम कम्युनिझमनें सुरू केलें. परंतु याच्या उलट असेंहि दिसतें कीं, खुद्द सोव्हिएट यूनियनमध्यें अनेक राष्ट्रें होतीं, तीं सुधारणेच्या भिन्न भिन्न पातळीवर, खालीं-वर होतीं. स्टॅलिननें कम्युनिझमच्या द्वारां हीं संकुचित राष्ट्रीयत्वें नामोहरम केलीं आणि ' कम्युनिझमची पितृभूमि ' या भावनेच्या ललकारीनें एकसंध विशाल राज्य निर्माण केलें.

### मागसलेल्या देशांत क्रांतीचा महान् प्रयत्न

स्टॅलिनला, मागसलेल्या राष्ट्रांत, सर्वांत पुढारलेल्या ध्येयवादाची उपासना करणारी क्रान्ति रचावयाची होती. त्या ध्येयवादाला लागणारी नागरिकांची उच्चतर मानसिक संस्कृति तेथें नव्हती. यांत्रिक औद्योगिक क्रान्तीनें निर्मिलेल्या विशाल आर्थिक वैभवाची योग्य वांटणी करण्यास आवश्यक असलेला वर्ग निरसनाचा राजकीय व सामाजिक कार्यक्रम अंमलांत आणणें एवढेंच कार्य तेथें नव्हतें. तेथें औद्योगिक क्रान्तीच अस्तित्वांत नव्हती. तेथें या औद्योगिक क्रान्तीशीं संलग्न अशी लोकशाही नव्हती; किंवा मानवी मूलभूत हक्कांचा पुरस्कार करणारा उदारमतवादहि नव्हता. कम्युनिझमचें समतेचें ध्येय सरळ पटवून घेणारी मानसिक संस्कृतीच तेथें नव्हती. अज्ञानी, दरिद्री, माणुसकीचें व स्वातंत्र्याचें महत्त्व न कळलेली अशी ती अर्धरानटी अवस्थेंतली जनता होती. त्या ठिकाणीं सर्वच कांहीं पहिल्यापासून निर्माण करावयाचें होतें. क्रान्ति हें केवळ स्वप्न होतें. झालेली क्रांति त्या मागसलेल्या जगांतील वैराण प्रदेशांत सहज लुप्त होऊन गेली असती ! या सर्व परिस्थितीचा अर्थ समजलेला वस्तुवादी ध्येयनिष्ठ आणि अनंत हिम्मत बाळगणारा स्टॅलिन, पक्षाची व सत्तेची संघटना करून, हुकूमशाहीच्या साधनाचा पुरेपूर उपयोग करण्यास सज्ज झाला. कम्युनिझमच्या प्रत्यक्ष उभारणीचा कार्यक्रम त्यानें आंखला. त्यानें उदारमतवादाची फिकीर बाळगली नाहीं. कारण रशियन संस्कृतीचा त्या ध्येयाशीं कांहींहि संबंध नव्हता. विवेकसंपन्न, सुसंस्कृत व स्वयंस्फूर्तीनें कार्य करणारा नागरिकवर्ग रशियांत नव्हता. म्हणून अशा नागरिकांच्या संघटनेचें नीतिशास्त्र स्टॅलिननें मान्य केलें नाहीं. मर्यादित कालखंडांत ठराविक कार्यक्रम पार पाडणें हें अत्यंत जरूरीचें आहे, नाहीं तर पूर्ण धोका व विनाश ठरलेला आहे, असें ओळखून संघटनेचीं हुकूमशाही तत्त्वेंच स्टॅलिननें अंगिकारिलीं. मार्क्स व लेनिन यांच्या क्रांतिशास्त्रांत कामगार-हुकुमशाहीचें तात्पुरतें अवलंबन करणें हें प्रशस्त मानलेंच होतें. पक्षाची हुकूमशाही तंत्रदृष्ट्या प्राप्तच होती. स्टॅलिनला दुसरा मार्ग मोकळा नव्हता. अराजक ध्येयवादाकडे जाण्याकरितां तात्पुरती परंतु आवश्यक पायरी म्हणून जी हुकूमशाही मार्क्सवादानें समर्थित केली, तिची








प्रचंड स्वरूपांतली उभारणी स्टॅलिननें केली. कारण, गत्यंतरच नव्हतें. मागसलेल्या देशांत वर्गहीन क्रांति उभारण्याच्या प्रयत्नाला याशिवाय दुसरें फळ येणें अशक्य होतें.

## नियोजन-युगाचा प्रणेता आणि अजिंक्य वीर

स्टॅलिननें नवी सत्ता, नवी अर्थरचना आणि नवा समाज निर्माण केला. नियोजन-युगाचा स्टॅलिन हाच प्रणेता होय. नियोजनाचा कार्यक्रम यशस्वी करून दाखवून स्टालिननें जगाचें अर्थशास्त्रच बदलून टाकलें. गरीब शेतकरीवर्ग धरणाची वीज व धरणाचें पाणी विकत घेण्यास असमर्थ असतो; मोठमोठीं धरणें आणि विद्युत्-उत्पादनाचीं केंद्रें आर्थिक दृष्ट्या डबघाईस आलेल्या राष्ट्रांत निर्माण केल्यावर त्याला गिऱ्हाइकांचा बाजार मिळत नसतो. स्टॅलिननें सामुदायिक शेतीचा प्रयोग करून नवा बाजार निर्माण केला. जीवनमान वाढविण्याचा प्रश्न हुकुमशाहीच्या जोरावर मागें रेटला. जास्त श्रम व कमी मोबदला, या धोरणाची अम्मलबजावणी केल्याशिवाय राष्ट्राची उत्पादनशक्ति विस्तारणें अशक्य आहे असें त्यानें पाहिलें. याहि धोरणाकरितां हुकूमशाही राज्यपद्धतीचा स्टॅलिनला उपयोग करून घेतां आला. राष्ट्राच्या आर्थिक, राजकीय व सांस्कृतिक कार्यक्रमाच्या अंमलबजावणीला हुकुमशाहीनें वेग आला. रॅडेक, झिनॉविव, बुखारिन, कॅमेनेव्ह, कॉसिन्, रॅकोवस्कि, ट्राट्स्की इत्यादि क्रांतिकारकांना नष्ट करण्याचें क्रूर कृत्य स्टॅलिनला करावें लागलें, म्हणून त्याला टीकाकार क्रूर समजतात. राज्यव्यवस्था कोणत्या प्रकारची आहे यावर या कृत्यांची मीमांसा अवलंबून आहे. वरील सगळे क्रांतिकारक, कामगारवर्ग व कामगारांचा पक्ष यांच्या हुकुमशाहीचें तत्त्व मान्य करणारे होते. हुकूमशाही ही कठोर नसावी, हें म्हणणें तलवारीला धार नसावी, असें म्हणण्याइतकेंच अनुचित आहे. क्रांतिकारकांचा बळी घेणें हें क्रांतीचें ऐतिहासिक कार्य आहे. 'क्रांति ही पुत्रभक्षक माता आहे' ही सुप्रसिद्ध म्हण ध्यानांत ठेवली पाहिजे. स्टॅलिनला प्राप्त कर्तव्य पार पाडणें अपरिहार्य होतें. भगवद्गीतेचा आदेश प्रमाण मानणाऱ्यांना स्टॅलिनचें कृत्य गर्ह्य वाटणार नाहीं. आडवा आलेला गर्भ कापावा लागतो, कापणाऱ्यास कोणीच दोषी ठरवीत नाहीं, असेंहि स्टॅलिनचें समर्थन होऊं शकतें. राज्य करीत असतांना शत्रूचें दमन करणें व कंटकांचा उच्छेद करणें हें सर्व राजनीतीला मान्य असलेलें सूत्र आहे. हें क्रूर कृत्य टाळणें हेंच स्टॅलिनला महत्त्वाचें वाटलें असतें तर राज्याच्या नेतृत्वाचा राजीनामा देण्याशिवाय दुसरा इलाज शक्य झाला नसता.

पंचवार्षिक योजनांच्या साफल्यानें स्टॅलिन हा विधायक कर्तृत्वाचा आदर्श ठरला. परंतु विश्वाला भय उत्पन्न करणारा अजिंक्य वीर म्हणून त्याची ओळख जगास तोंपर्यंत पटली नव्हती. विश्वमान्य विजयी सेनापतींचा जो कांहीं इतिहास आज माहीत आहे, त्यांत स्टॅलिननें उच्चतम स्थान दुसऱ्या महायुद्धाच्या अखेरीस मिळविलें. त्याची पूर्वतयारी त्यानें १९१७ सालापासून १९४० सालापर्यंतच्या काळांत केली. सोव्हिएट यूनियनची सर्वांगीण रचना करण्यांत त्यानें सर्व प्रकारच्या सामाजिक शक्ती पणास लावल्या. अस्ताव्यस्त, अर्धरानटी, मतिमंद व पडिक स्थितींतल्या जुनाट जगाच्या कुशींतून, मुशींत ओतलेल्या पोलादी पुरुषाप्रमाणें सामर्थ्यशाली व भव्य राष्ट्र त्यानें निर्मिलें. हें निर्मीत असतां जगांतील सर्व राष्ट्रांमध्यें, जगाच्या कानाकोपऱ्यांतहि त्यानें सोविएट यूनियनच्या ध्येयवादाचा झेंडा घेऊन उभे असलेले कम्युनिस्ट गट संघटित केले. जागतिक कम्युनिस्ट चळवळीशीं सोविएट यूनियनच्या राजकारणाचा आत्मीयतेचा संबंध कायम राखला. हिट्लरची पोलादी सेना सोविएट यूनियनच्या तटबंदींना आरपार फोडून जेव्हां खोलवर शिरली तेव्हां स्टॅलिनची लालसेना हजारों मैलपर्यंत लढत लढत मागें रेटली गेली होती. अशा प्रसंगीं पराभव जवळजवळ अटळ दिसत होता. परंतु राजकीय दृष्ट्या सोविएट यूनियनची किंमत याच वेळीं अत्यंत उंचावली होती. त्यामुळें राष्ट्राचें धैर्य अधिक मजबूत झालें. 'राजनैतिक विजय प्रथम मिळवावयाचा, त्यामुळें दीर्घ काल टिकाव धरतां







येईल; शत्रूचा दम आटेल आणि अखेरीस लष्करी विजय प्राप्त होईल' असा अंदाज स्टॅलिननें हिट्लरी आक्रमणाच्या पहिल्या दिवशींच सूचकपणें व्यक्त केला होता.

## जुन्या जगास आह्वान

दुसऱ्या महायुद्धानंतर जगांतील सर्वांत मोठ्या अजिंक्य सेनेचा निर्माता म्हणून स्टॅलिन जगाच्या दृष्टीसमोर उभा राहिला. सर्व पूर्व यूरोप लाल झाला. कम्युनिझमनें एक तृतीयांश मानवजात लाल झेंड्याखालीं आणली. परंतु सुसंस्कृत मनुष्याची, स्वातंत्र्यपूर्ण व विश्वबंधुत्वानें व्यापलेली संस्कृति लवकरच अवतरेल, ही आशा मात्र दुरावली आहे. स्टॅलिननें ज्या प्रकारची कम्युनिझम मूर्तरूपास आणली आहे तिच्यांत मानवतावादी चळवळीस समाधान प्राप्त न होतां निराशाच निर्माण होते. कम्युनिझमच्या कक्षेबाहेरील राष्ट्रांतील संस्कृति जीर्ण, अवनत व पतित झाली आहे. तिच्या समर्थकांना व राज्यकर्त्यांना कम्युनिझमचें भय वाटतें. कारण कम्युनिझम ही जुन्या जगाला आव्हान देणारी शक्ति आहे. 'बदला नाहीं तर मरणास तयार व्हा' असें तें आह्वान आहे. मरण जवळ येत आहे, अशी भीति या जुन्या जगाच्या हृदयाला शुष्क करीत आहे. या जुन्या जगाला आत्मविश्वासच वाटत नाहीं. कारण तसें वाटण्यासारखें त्याच्यापाशीं कांहींहि शिल्लक नाहीं. पाश्चात्त्य राष्ट्रांची राजकीय लोकशाही व त्यांचा उदारमतवाद निस्तेज झाला आहे आणि पौर्वात्य राष्ट्रांचा अध्यात्मवाद काल्पित व भावुक कथांची कंथा बनली आहे; त्यांचा पोकळ दिमाख अध्यात्मवादाच्या लक्तरांनीं उघडा पाडला आहे.

## मानवतावादी मूल्यांना दुय्यम स्थान !

विज्ञान, यंत्र व आधुनिक उत्पादनतंत्र यांच्या महिम्यावर, स्टॅलिननें मूर्तस्वरूपास आणलेला कम्युनिझम पूर्ण श्रद्धा ठेवतो. परंतु वैज्ञानिक दृष्टिकोनास कम्युनिझमच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानांत स्थान राहिलेलें नाहीं. प्रत्येक श्रद्धेय तत्त्वावर आक्षेप घेण्याचा अधिकार मानणें हें या दृष्टिकोनाचें पहिलें सूत्र आहे. त्याशिवाय समीक्षाच अशक्य आहे. समीक्षेलाच कम्युनिस्ट पक्षाच्या शब्दप्रामाण्यानें शृंखला घातल्या आहेत. हें एक उच्चतम मानवी मूल्यच आधुनिक कम्युनिझमनें भ्रष्ट केलें आहे, त्यामुळें मानव्याच्या अंतरंगाशीं त्यानें प्रतारणा केली आहे. विचारस्वातंत्र्य हें ज्ञानसाधनेचें प्रेरक तत्त्व आहे, याचा पूर्ण विसर कम्युनिस्ट पुरोहितशाहीला पडला आहे. विसाव्या शतकांतला कम्युनिझम म्हणजे मध्ययुगीन युरोपांतील चर्चचें प्रकट झालेलें पिशाचच होय. मानवी समतेचा किंवा मानवानें मानवावर सत्ता चालवितां कामा नये याचा ध्यास धरून प्रथम कम्युनिझमची व समाजवादाची चळवळ जगांत उत्पन्न झाली; परंतु विसाव्या शतकांतील कम्युनिझमनें निर्माण केलेल्या राज्यसंस्थेंत नागरिक हा राज्यसत्तेचा पूर्ण अंकित झाला आहे. केंद्रीभूत मध्यवर्ती सत्तेचा अनन्यभक्त, असें, नागरिकाला स्वरूप प्राप्त झालें आहे. लेनिनसारख्या कम्युनिस्टांनीं प्रत्यक्ष लोकशाही (Direct Democracy) हेंच कम्युनिझमचें राजकीय स्वरूप पाहिलें. हें नैतिक, ध्येयवादी प्रेरणेला उत्तेजित करणारें स्वरूप आधुनिक कम्युनिस्ट पूर्णपणें विसरला आहे. सोव्हिएट यूनियनच्या स्तुतिपाठाच्या पोथ्या पाठ करीत आधुनिक कम्युनिस्ट श्रद्धाजड बनला आहे. एकतृतीयांश मानवजातींत जो कम्युनिझमचा प्रयोग सुरू आहे, त्याच्यांत मूलभूत मानवी मूल्यांना जर मूर्तिमंत स्वरूप देण्याचा प्रयत्न सफल होत असता तर पाश्चात्त्य राष्ट्रांतील नागरिकानें त्याचें सौहार्दानें प्रथम स्वागत केलें असतें. आज भांडवलशाही अर्थव्यवस्थेची अब्रू कोठेंच शिल्लक राहिलेली नाहीं. पाश्चात्त्य राष्ट्रांतील भांडवलशाहीच्या नांवानें खडे फोडणें हेंसुद्धां अंधपरंपरेचेंच लक्षण आहे. प्रयोगांत आलेला कम्युनिझम मानवाला बंधमुक्तीची आशा निर्माण करूं शकत नाहीं. कम्युनिझमच्या पलीकडे गेलें पाहिजे; कारण कम्युनिझमनें मानवतावादी मूल्यांना दुय्यम स्थान दिलें आहे. स्टॅलिननें कम्युनिझमला व्यवहार्य आणि मूर्तिमंत स्वरूप दिलें हेंच त्याचें जागतिक इतिहासांतील अद्वितीय कार्य आहे. त्याच्या कार्याची नीट समीक्षा करून माणसानें पुढें जावें, असा इशारा त्याचा अस्त देत आहे.

# कॉलेजमधील विद्यार्थ्यांची आर्थिक परिस्थिति

**पुणें** येथील बृहन्महाराष्ट्र कॉमर्स कॉलेजमधील विद्यार्थ्यांच्या आर्थिक परिस्थितीची पाहाणी जानेवारी १९५२ मध्यें हातीं घेण्यांत आली होती. ११ जून १९५१ ते १५ मार्च १९५२ या अध्ययन-कालखंडाला अनुलक्षून माहिती गोळा करण्यांत आली. महिन्यांतील खर्चाचा निश्चित आंकडा मिळावा या हेतूनें १६ जानेवारी १९५२ ते १४ फेब्रुवारी १९५२ या तीस दिवसांचा हिशोब काळजीपूर्वक लिहून ठेवण्यास सांगण्यांत आलें. कॉलेजमधील एम्. कॉम. खेरीज इतर वर्गांतील प्रत्येक विद्यार्थ्याला प्रश्नपत्रिका देण्यांत आली. एकूण दिलेल्या ६६५ प्रश्नपत्रिकांपैकीं ४२५ प्रश्नपत्रिका भरून परत आल्या. यांपैकीं २०४ विद्यार्थी नियमित हिशोब ठेवणारे होते. सर्वच उत्तर-पत्रिकांतील माहिती ताळे करून विचारपूर्वक पडताळून घेण्यांत आली. या माहितीवरून निघालेले निष्कर्ष कांहींसे सारांशरूपानें पुढें देण्यांत आलेले आहेत. व्यापार व तत्सम व्यवसायांत असणाऱ्या लोकांचीं मुलें या व्यापार-महाविद्यालयांत जरा अधिक प्रमाणांत आढळतात. अशा मुलांचा आंकडा १२३ होता. परंतु हा फरक सोडला तर या कॉलेजांतील विद्यार्थी व इतर (विशेषतः पुण्यांतील आर्टस्, सायन्स व लॉ कॉलेज यांतील) कॉलेजांतील विद्यार्थी यांच्या परिस्थितींत कांहीं विशेष फरक पडण्याचें कारण दिसत नाहीं. यामुळेंच ही माहिती उद्बोधक ठरेल अशी आशा वाटते.

पालकांच्या व्यवसायाप्रमाणें विद्यार्थ्यांचे प्रमुख वर्ग असे : व्यापार व तत्सम व्यवसाय १२३; वार्षिक २५०० रुपयांहून अधिक पगाराचा वर्ग ६९; वार्षिक २५०० रुपयांहून कमी पगाराचा वर्ग ५७; शेतकरी ३६; जमिनदार १५; शिक्षक ३७; वकील २६; डॉक्टर १२; पेन्शनर २१. एका विद्यार्थ्याचे वडील कचेरींत साधा शिपाई म्हणून काम करीत होते.

पालकांच्या वार्षिक उत्पन्नाची वर्गवारी व विद्यार्थिसंख्या पुढें दिली आहे. (पालकांच्या वार्षिक उत्पन्नाची माहिती ७० जणांनीं दिलेली नव्हती.)

| वार्षिक उत्पन्न | विद्यार्थि-संख्या |
|---|---|
| १००० रु. पर्यंत | ५ |
| १००१ ते २००० रु. | ९१ |
| २००१ ते ३००० रु. | ८० |
| ३००१ ते ५००० रु. | ८२ |
| ५००१ ते ८००० रु. | ४२ |
| ८००१ ते १०००० रु. | २३ |

बावीस जणांच्या पालकांचें वार्षिक उत्पन्न १०,००० रुपयांहून अधिक होतें. आणि यांपैकीं १६ जणांच्या बाबतींत तर हें उत्पन्न २०,००० रुपयांहूनहि अधिक होतें. वसतिगृहांतील ९५ विद्यार्थ्यांपैकीं २२ विद्यार्थ्यांच्या पालकांचें वार्षिक उत्पन्न २००० रुपयांहून कमी होतें व २००१ ते ४००० या वर्गांत ३१ विद्यार्थी येत होते. श्रीमंतांच्या मुलांपैकीं वसतिगृहांत राहणाऱ्यांचें प्रमाण अधिक आढळून आलें ही गोष्ट खरी; परंतु दुसऱ्या महायुद्धाच्या काळापासून गरीब मध्यमवर्गांतील विद्यार्थीहि मोठ्या प्रमाणांत वसतिगृहांत आढळूं लागले आहेत. आजच्या परिस्थितींत बाहेर कोठेंहि












# कॉलेजमधील विद्यार्थ्यांची आर्थिक परिस्थिति

राहण्यापेक्षां वसतिगृहांत राहणेंच अधिक सोयीचें व स्वस्तहि पडतें असाच अनुभव आहे. परंतु या वर्गांतील विद्यार्थ्यांचें जीवनमान मात्र फारच निकृष्ट असतें व पुरेशी शारीरिक कार्यक्षमताहि त्यांना सांभाळतां येत नाहीं.

विद्यार्थ्यांच्या कॉलेजमधील शिक्षणाचा पालकाच्या वार्षिक उत्पन्नावर किती भार पडतो हें दर्शविणारें एक कोष्टक तयार करण्यांत आलें आहे. दोन हजार रुपयांच्या खालीं उत्पन्न असणाऱ्या ९६ पालकांपैकीं ६३ पालकांना आपल्या उत्पन्नाचा शेंकडा ४० हून अधिक भाग पाल्यांच्या शिक्षणासाठीं खर्च करावा लागत होता. उत्पन्न वाढत गेलें तसतसें अर्थातच हें प्रमाण कमी होत गेलें, परंतु तरीहि ५००० रुपये उत्पन्नापर्यंतच्या वर्गांत शेंकडा २० ते ३० टक्के खर्च या कार्यासाठीं लागे.

वार्षिक खर्च ५०० रुपयांहूनहि कमी करणारे ८ विद्यार्थी होते. ५०१ ते ७०० करणारे १०६ जण होते; ७०१ ते १००० करणारे १६१; १००१ ते १५०० करणारे ८३; व १५०० रुपयांहून अधिक खर्च करणारे ११ जण होते. ४८ जणांनीं ही माहिती दिली नव्हती. ( चार वर्षांविषयीं विचारलेल्या माहितींत सीनियर बी. कॉम्. मधील एका विद्यार्थ्यानें ज्यूनिअरच्या वर्षांत ४५०० रुपये खर्च केल्याचा आंकडा दिला. पालकाचें वार्षिक उत्पन्न १६००० रुपये. )

शिक्षणासाठीं या वर्षांत लागलेला खर्च १९१ जणांना आईवडिलांकडून मिळाला होता. ३१ जण या बाबतींत भाऊ व इतर नातेवाईक यांच्यावरच सर्वस्वीं अवलंबून होते. यांखेरीज ६५ जणांचें शिक्षण आईवडील व इतर नातेवाईक यांच्या कमी-अधिक आर्थिक सहकार्यामुळेंच शक्य होत होतें. ७ जण शिक्षणाच्या खर्चाच्या बाबतींत पूर्णपणें स्वावलंबी होते. १२ जण स्वावलंबनानें आपल्या शिक्षणासाठीं लागणाऱ्या खर्चापैकीं शेंकडा ५० हून अधिक खर्चाची तरतूद करीत होते. शेंकडा ५० पर्यंत कमी-अधिक अर्जन करणारे ४५ विद्यार्थी निघाले. ७५ जणांना स्कॉलरशिप व इतर मार्गांनीं मदत मिळाली होती. २९ जणांनीं कमी-अधिक प्रमाणांत कर्ज काढलें होतें. शिक्षणासाठीं प्रतिवर्षीं ३०० ते ५०० रुपये कर्ज काढणारे चौघेजण होते. इतरांचे कर्जाचे आंकडे याहून खालचे होते. अगदीं निकृष्ट अवस्थेंत राहूनहि कॉलेजचें शिक्षण साधतें न साधतें अशी परिस्थिति निर्माण झाली कीं मगच माणूस कर्ज काढण्यास प्रवृत्त होतो. एरव्हीं, कांहीं किमान राहणी कार्यक्षमतेच्या व इतर दृष्टींनीं आवश्यक आहे. एवढ्याकरितां कोणी सहसा शिक्षणासाठीं कर्ज उभारण्याचा मार्ग स्वीकारीत नाहीं.

मार्गदर्शिका व टिप्पण्या यांवर वार्षिक तीन रुपयांहून कमी खर्च करणारे २८९ विद्यार्थी होते, तीन ते दहा रुपयांपर्यंत खर्च करणारे ८० जण होते, दहा रुपयांहून अधिक खर्च करणारे २१ जण होते. पाठ्यपुस्तकांच्या बाबतींत, दहा विद्यार्थ्यांनीं कांहींहि पाठ्यपुस्तकें विकत घेतलीं नव्हतीं; ६९ जणांनीं वर्षांत दहा रुपयांहूनहि कमी खर्च केला होता; चाळीस रुपयांहूनहि अधिक खर्च करणारे ८६ विद्यार्थी होते. पाठ्यपुस्तकांवरील खर्चापेक्षां टिप्पण्यांवर अधिक खर्च करणारे चौघेजण निघाले. ( या विभागांत २५ विद्यार्थ्यांनीं माहिती पुरविली नव्हती. )

विद्यार्थ्यांचा वेगवेगळ्या गोष्टींवरील खर्च दाखविणारीं कोष्टकें लेखाच्या शेवटीं दिलेलीं आहेत. तीं अनेक दृष्टींनीं अभ्यसनीय आहेत. प्रत्येक बाबतींत मुळींच खर्च न करणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे. कल्पनेंत व कथा-कादंबऱ्यांत रंगविल्या जाणाऱ्या कॉलेज-विद्यार्थ्यांहून सर्वसाधारण कॉलेज-विद्यार्थी किती वेगळा असतो हें त्यावरून आढळून येईल. अपेक्षित वर्णनाशीं जुळणारे कॉलेज विद्यार्थी अगदींच आढळत नाहींत असें मात्र नाहीं.

उपाहारगृहावर कांहींहि खर्च न करणारे ९६ विद्यार्थी होते; २०८ विद्यार्थी १ ते ६ रु. खर्च करणाऱ्या गटांत आहेत; मासिक पंधरा रुपयांहून अधिक खर्च करणारे ३८ विद्यार्थी होते.

दूध ह्या अत्यंत जीवनावश्यक वस्तूवर १०८ विद्यार्थी कांहींहि खर्च करूं शकत नव्हते. ११७ विद्यार्थ्यांचा खर्च मासिक पांच रुपयांहून कमी होता. पांचहून अधिक ते दहा रुपयांपर्यंतच्या गटांत १६१ विद्यार्थी पडत होते. मासिक पंधरा








रुपयांहून अधिक खर्च करणारे ३२ जण होते. सातजणांनीं माहिती दिली नव्हती. दुधावर कांहींहि खर्च न करणारे परंतु सिनेमावर तीन ते सात रुपये खर्च करणारे २४ विद्यार्थी निघाले. खर्चाची योग्य ती दृष्टि नाहीं हें त्याचें जसें एक कारण आहे तसेंच दूध दररोज रतीबानें घेतलें जातें व त्यामुळें मासिक खर्चाचा आंकडा हिशोब करतांना एकदम मोठा वाटत असल्यामुळें कमी उत्पन्न असतांना दूध घेण्याकडे प्रवृत्ति होत नाहीं, हीहि गोष्ट खरी आहे.

जेवणाचा खर्च हा आतां जवळजवळ सार्वत्रिक-च मासिक ३५ ते ४० च्या दरम्यान झालेला आहे. कांहीं विद्यार्थ्यांचा भोजनखर्च मात्र मासिक वीस रुपयांहून कमी आढळला. या बाबतींत उत्तर-पत्रिका कसोशीनें तपासल्या. नऊजणांच्या बाबतींत तरी दारिद्र्यामुळें त्यांना दोन वेळ जेवण घेणें परवडत नसावें असें निःसंशयपणें वाटलें. त्यांच्या पालकांचें सरासरी वार्षिक उत्पन्न बाराशें रुपयांहून कमी होतें.

—( अहवालाचा हा सारांश ' बृहन्महाराष्ट्र कॉमर्स कॉलेज 'चे प्राचार्य त्र्यं. म. जोशी यांच्या अनुमतीनें प्रसिद्ध करण्यांत येत आहे. यांतील निष्कर्षात्मक विधानांची जबाबदारी मात्र आमची दोघांची आहे. —लेखक )

---

## बृ. म. कॉमर्स कॉलेजमधील विद्यार्थ्यांची आर्थिक पहाणी

### १. वार्षिक खर्च

| खर्च रुपये | ० | १–१० | ११–२० | २१–३० | ३१–४० | ४० चे वर | माहिती दिली नाहीं |
|---|---|---|---|---|---|---|---|
| इतर पुस्तकें व मासिकें | ११७ | १७२ | ५१ | १४ | ८ | — | ३ |
| वह्या व लेखनसाहित्य | — | २१८ | १३१ | ३८ | १८ | १९ | १ |
| खासगी वर्ग, शिकवण्या | ३०१ | ११ | ३१ | २१ | २८ | २३ | १० |
| प्रवास ( घरीं जाणें-येणें खेरीज ) | १५८ | १२९ | ६० | ३७ | ९ | २५ | ७ |
| औषध | २२२ | १०० | ४९ | २७ | ३ | २४ | — |

### २. मासिक खर्च

| खर्च रुपये | ० | १ | २ | ३ | ४ | ५ | ५ हून अधिक | नक्की माहिती दिली नाहीं |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वर्तमानपत्रें | २०८ | ६५ | ५० | २६ | १४ | २७ | ८ | २७ |
| धोबी | ७६ | ११२ | १०७ | ६० | २६ | २५ | १९ | — |
| फळें | १३७ | ८५ | ७१ | ४० | १२ | २७ | १८ | ३५ |
| सिनेमा | १०९ | १०५ | ८७ | ४७ | २१ | २३ | २६ | ७ |

---

प्रा. नारायण र. देशपांडे

# जागतिक राजकारणाचा बदललेला रागरंग

मार्शल स्टॅलिन यांच्या निधनामुळें जागतिक शांततेची शक्यता वाढली आहे असें मत अमेरिकेचे परराष्ट्रमंत्री जॉन फॉस्टर डलेस यांनीं व्यक्त केलें. त्याच वेळीं स्टॅलिनयुग संपून आतां आयसेनहॉवरयुग सुरू होत आहे, अशा तऱ्हेचा आशावादहि त्यांनीं बोलून दाखविला.[१] स्टॅलिनच्या मृत्यूनंतर गेल्या दीड महिन्यांत जागतिक राजकारणाचें स्वरूप जें मोठ्या प्रमाणावर बदललें आहे त्यामुळें डलेस यांच्या पहिल्या विधानाला पुष्टीच मिळते. परंतु स्टॅलिनयुग संपून आयसेनहॉवरयुग सुरू होत असल्याबद्दलच्या त्यांच्या आशावादाला चालू परिस्थितींत कांहीं आधार आहे काय हें पाहावयाचें असल्यास, गेल्या दीड-दोन महिन्यांतील आंतरराष्ट्रीय परिस्थितीच्या हेलकाव्यांचा बारकाईनें अभ्यास करणें जरूर आहे.

## दोन सत्ता-गटांच्या नेतृत्वांत बदल

दुसऱ्या महायुद्धानंतरचें आंतरराष्ट्रीय राजकारण म्हणजे दोन प्रबल सत्ता-गटांची सत्तेसाठीं चाललेली रस्सीखेच हें होय. आंतरराष्ट्रीय राजकारणाचें हें स्वरूप जागतिक शांतता व सर्व राष्ट्रांचा खुला विकास यांना विघातक असलें तरी तें आजच्या परिस्थितीचें वास्तव स्वरूप म्हणून गृहीत धरलें पाहिजे. आणि अशा परिस्थितीमध्यें दोन्ही सत्ता-गटांचें सामर्थ्य, धोरण, डावपेंच, नेतृत्व व नेतृत्वांतील बदल वगैरे गोष्टी जागतिक परिस्थितीवर परिणाम करणाऱ्या म्हणून महत्त्वाच्या ठरतात. राष्ट्राच्या सामर्थ्याचा उपयोग राष्ट्रहितासाठीं योग्य तऱ्हेनें होणें न होणें हें पुष्कळ अंशीं राष्ट्रीय नेत्यांच्या धोरणावर व कुवतीवर अवलंबून असतें. परिस्थिति पाहून हें सामर्थ्य कोठें, कधीं व कशा तऱ्हेनें कामीं लावावयाचें याबाबतचें योग्य धोरण ठरवून तें अंमलांत आणण्यामध्यें आणि राष्ट्रहित जास्तींत जास्त साधण्यामध्येंच खरोखर नेतृत्वाची कसोटी असते. आंतरराष्ट्रीय राजकारणांतील सत्ता-गट हे जरी अनेक राष्ट्रघटकांचे गट मिळून बनले असले, तरी या सत्ता-गटांच्या नेतृत्वालाहि राष्ट्रीय नेतृत्वाच्या कसोट्या लागू पडतातच. या दृष्टीनें सध्यांच्या आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या आंदोलनांत सत्ता-गटांच्या नेतृत्वाच्या गुणावगुणांची पारख होण्यास मदत होते.

गेल्या कांहीं महिन्यांमध्यें दोन्ही सत्ता-गटांच्या नेतृत्वामध्यें बदल झालेला आहे. अमेरिकेंतील अध्यक्षीय निवडणुकीमध्यें रिपब्लिकन पक्षाचा विजय होऊन आयसेनहॉवरची राजवट सुरू झाल्यामुळें अँग्लोअमेरिकन सत्ता-गटाच्या नेतृत्वांत बदल झाला. अमेरिकेंत रूढ झालेल्या विशिष्ट परंपरेमुळें अध्यक्षीय राजवट बदलल्याबरोबर राज्यकारभारांतील प्रमुख अधिकारी तर बदलतातच; पण मध्यवर्ती सरकारच्या नियंत्रणाखालील लहान-मोठ्या अधिकाऱ्यांमध्येंसुद्धां मोठ्या प्रमाणावर बदल होतो. विशेषतः सरकारी धोरण ठरविण्यामध्यें ज्या ज्या अधिकाऱ्यांचा भाग असतो त्यांच्या बाबतींत नवीन राजवट आपल्या पसंतीचे नवे अधिकारी नेमण्याबद्दल दक्षता

---

१. 'The death of Stalin had increased the world's chances for peace... and...the Eisenhower era begins, as the Stalin era ends.'

—'न्यू यॉर्क टाइम्स', १० मार्च १९५३.








घेते.[२] ही परंपरा इंग्लंडमध्यें रूढ नाहीं, आणि इंग्लंडमधील राज्यपद्धतीला ती जुळणारीहि नाहीं. त्यामुळें निवडणुकीनंतर अधिकारारूढ पक्षामध्यें जरी खांदेपालट झाला तरी इंग्लंडमध्यें सरकारी अधिकारी मोठ्या प्रमाणावर बदलले जात नाहींत. आज अमेरिकेकडे एका सत्ता-गटाचें नेतृत्व असल्या-मुळें अमेरिकेंतील या परंपरेचे परिणाम प्रत्यक्षाप्रत्यक्ष-रीत्या आंतरराष्ट्रीय राजकारणावर होतात आणि म्हणून या परंपरेची दखल घेणें भाग पडतें.

अमेरिकेंतील अध्यक्षीय राजवट बदलल्यामुळें या सत्ता-गटाच्या नेतृत्वांत बदल झाला हें तर खरेंच; पण शिवाय, नेतृत्व बदललें आहे ही गोष्ट प्रामुख्यानें इतरांच्या नजरेस आणून देण्याची नव्या नेत्यांची ईर्षाहि आहे. सामाजिक संबंधा-सारख्या किरकोळ गोष्टींमध्येंहि नेतृत्व बदलल्याची जाणीव करून देण्यांत नवे अधिकारी प्रौढी मान-तात असें दिसतें. संयुक्त राष्ट्र-असेंब्लीच्या बैठकीच्या सुरुवातीच्या वेळीं रशियन प्रतिनिधि व्हिशिन्स्की याजबरोबर हस्तांदोलन करण्यास अमेरिकेचा नवा प्रतिनिधि हेन्री कॅबट लॉज यानें नकार दिला व पत्रकारांनीं त्यासंबंधीं प्रश्न विचारला तेव्हां ' अमेरिकेची राजवट बदलली आहे ' असें जें लॉजनें उत्तर दिलें, तें याचें गमक आहे.

### अमेरिकेचें धोरण प्रभावी कां झालें नाहीं ?

अमेरिकेच्या आणि म्हणून अँग्लोअमेरिकन सत्ता-गटाच्या नेतृत्वांत बदल झाल्याची जाणीव सर्वांना झाली हें खरें; पण हा बदल प्रभावी ठरला काय व तो इष्ट दिशेनें झाला आहे काय यांबद्दल तीव्र मतभेद आहेत. आंतरराष्ट्रीय राज-कारणामध्यें नवें चढाईचें धोरण पुरस्कारून आपल्या गटाकडे पुढाकार मिळवावयाचा हें नव्या रिपब्लिकन राजवटीचें मुख्य सूत्र आहे. प्रतिस्पर्धी सत्ता-गटाला आपल्या धोरणाचा नक्की कयास न लागून तो बुचकळ्यांत पडेल आणि त्यामुळें आपल्याला डावपेंच खेळण्यास पुरेसा वाव सांपडेल अशी एक कल्पना अमेरिकेंतील नेतृ-वर्गाला अभिप्रेत दिसते. नव्या धोरणाची नांदी म्हणून आयसेनहॉवर यांनीं फोर्मोसाच्या समुद्रांतून सातवें आरमार काढून राष्ट्रीय चीनच्या सरकारला चीनच्या मुख्य भूमीवर हल्ले करण्यास मोकळीक करून दिली. हा हुकूम चढाईच्या धोरणाचा निदर्शक तर होताच; पण त्याहिपेक्षां अतिपूर्वे-कडील राजकारणामध्यें अमेरिकेनें पुढाकार घेतल्या-चा निदर्शक होता. या नव्या धोरणाचा पुरा अन्वयार्थ काय आहे यासंबंधीं चीन व रशिया-प्रभृति कम्युनिस्ट गटांतील राष्ट्रें बुचकळ्यांत पडून त्यांच्या हालचालींना पायबंद बसावा असाहि हेतु हा हुकूम काढण्यामागें होता. जें गतिमान् ' वि-मोचक ( Liberation चें ) धोरण स्वीकारण्याची रिपब्लिकन पक्षानें निवडणुकीच्या वेळीं घोषणा केली होती त्याची ही अशी सुरुवात झाली.

फोर्मोसाच्या समुद्रांतून आरमार काढून घेण्याच्या हुकुमाच्या ज्या प्रतिक्रिया आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत झाल्या, त्यामुळें अमेरिकेच्या या नव्या धोरणाचा प्रभाव पडण्याऐवजीं या धोरणालाच पायबंद बसला असें म्हणणें भाग आहे. अमेरिकेच्या दोस्तराष्ट्रांनीं या नव्या हुकुमाबद्दल आपली नापसंती स्पष्ट शब्दांत प्रकट केली. या नव्या धोरणामुळें जागतिक संघर्ष वाढण्याची शक्यता निर्माण झाली आहे, असाच मतप्रवाह अनेक देशांमध्यें व्यक्त झाला. भारताची प्रतिक्रिया ही या मतप्रवाहाची निदर्शक होती. या नव्या धोरणामुळें जागतिक युद्धाचा संभव वाढला आहे असें मत गेल्या फेब्रुवारींत, भारताच्या राष्ट्राध्यक्षांनीं

---

२ सनदी नोकरीसंबंधींच्या नियमांचें संरक्षण मिळाल्यामुळें डेमोक्रॅटिक पक्षाच्या पसंतीचे जे शेंकडों नोकर अजून मध्यवर्ती सरकारच्या नोकरींत आहेत त्यांच्या जागीं रिपब्लिकन पक्षाच्या पसंतीचे नवे लोक आणतां यावे यासाठीं धोरण ठरविणाऱ्या अधिकाऱ्यांच्या जागांचा एक खास विभाग आयसेनहॉवर यांनीं अध्यक्षीय हुकुमानें उघडला असून, त्यामुळें बराचशा अधिकाऱ्यांना यापुढें सनदी नोकरीचें संरक्षण मिळणार नाहीं. अशा अधिकाऱ्यांची संख्या कित्येक हजार असेल असा अंदाज आहे.—पाहा, ' न्यू यॉर्क टाइम्स ', २ एप्रिल १९५३.

आपल्या पार्लमेंटसमोर केलेल्या भाषणामध्यें व पंत-प्रधानांनीं त्याच सुमारास जी मुलाखत दिली तिच्यांत व्यक्त केलें होतें. अमेरिकेंतील रिपब्लिकन पक्षाच्या धोरणामुळें तिसरें महायुद्ध उद्भवेल असें भारतांतील सामान्य लोकमत होतें.[३] या धोरणाच्या भावी परिणामांबद्दल प्रतिस्पर्धी कम्युनिस्टगट बुचकळ्यांत पडण्याऐवजीं अमेरिकेचीं दोस्तराष्ट्रें व इतर तटस्थ राष्ट्रेंच जास्त बुचकळ्यांत पडलीं. आपल्या सत्ता-गटामध्येंच मतभेद वाढून आपलें सामर्थ्य कमी होऊं नये म्हणून आशंकित दोस्तराष्ट्रांची समजूत घालणें अमेरिकेला भाग पडलें आणि त्या कामीं आपल्या नव्या आंतरराष्ट्रीय धोरणाचें स्वरूप किती मर्यादित राहील याबद्दलचें आश्वासनहि तिला द्यावें लागलें. अतिपूर्वेकडे युद्धक्षेत्र वाढेल असें कोणतेंहि कृत्य करण्याचा आपला विचार नाहीं, चीनची नाकेबंदी करण्याचाहि विचार नाहीं, कोणतेंहि नवें धोरण आंखण्यापूर्वी कॉंग्रेसला व अमेरिकेच्या दोस्तराष्ट्रांना पूर्णपणें विश्वासांत घेतलें जाईल अशीं आश्वासनें आयसेनहॉवर व परराष्ट्र-मंत्री डलेस यांनीं दिलीं. याचा परिणाम असा झाला कीं, रिपब्लिकन पक्षांतील कांहीं लोकांच्या कल्पनेप्रमाणें अमेरिका पुढाकार घेऊन चढाईचें धोरण स्वीकारील अशी जी शक्यता होती ती पुष्कळशा प्रमाणांत कमी झाली. नेतृत्वांत बदल झाल्यामुळें अँग्लोअमेरिकन गटाचें धोरण बदलण्याची शक्यता मर्यादित झाली.

गेल्या सहा-सात वर्षांमध्यें म्हणजे आंतरराष्ट्रीय राजकारणांत शीत युद्धा-( cold war )ची अवस्था सुरू झाल्यापासून, अँग्लोअमेरिकन गटाचें धोरण सामान्यतः रशियाच्या साम्राज्यवादी विस्ताराला पायबंद घालण्याचें होतें. तात्कालिक स्वरूपाचे डावपेंच करण्याऐवजीं, उतावीळ न होतां आणि जागरूक राहून, रशियाच्या साम्राज्यवादी विस्तारास निश्चितपणें पायबंद घालावयाचें दीर्घकालीन धोरण स्वीकारलें, तर रशियाच्या साम्राज्यांत फूट पडेल अगर रशियाचें सामर्थ्य हलकें हलकें संपुष्टांत येईल, अशा विचारसरणीवर हें पायबंद घालण्या-( containment )चें धोरण आधारलेलें होतें. ग्रीस व तुर्कस्तान यांना मदत देण्याचें ट्रुमन-धोरण, मार्शल-योजना, उत्तर ॲटलांटिक संघटनेसारख्या प्रादेशिक संघटना व अ-प्रगत राष्ट्रांच्या विकासास साहाय्य देण्याची चतुर्थ कलमी योजना या सर्व योजना याच मोठ्या धोरणाचे टप्पे होत्या. हें धोरण नकारात्मक व पराभूत मनोवृत्तीचें द्योतक म्हणून तें बदलून, त्याऐवजीं विधायक व गतिमान् असें 'विमोचना'-( Liberation )चें धोरण स्वीकारण्याचा रिपब्लिकन पक्षानें पुरस्कार केला. पण गेल्या तीन महिन्यांच्या अनुभवानंतर अमेरिकेच्या नव्या राजवटीला धोरण बदलण्याबाबत नवें नेतृत्व प्रभावी करतां येईल अशी शक्यता कमी दिसते.[४]

---

३ 'इंडियन न्यूजपेपर्स फीचर्स सिंडिकेट 'नें भारताच्या निरनिराळ्या भागांत अलीकडे जी लोकमताची चांचणी केली त्यावरून पुढीलप्रमाणें भारतीय लोकमत व्यक्त झालेलें आढळलें : रिपब्लिकन राजवटीच्या धोरणाचा परिणाम तिसरें महायुद्ध ओढविण्यांत होईल असें शें. ७३·१ लोकांनीं मत दिलें. शें. १९·४ लोकांना ही भीति वाटली नाहीं. शें. ७·५ लोकांचें मत अनिर्णीत होतें. त्याचप्रमाणें शें. ७७·३ लोक आयसेनहॉवरच्या चीनबाबतच्या धोरणास प्रतिकूल होते; शें. १७·५ अनुकूल होते व शें. ५·२ तटस्थ होते. —( 'फ्री प्रेस बुलेटिन', २५ मार्च १९५३.)

४. "It is believed that the Administration will not take any action that might extend the Korean war......therefore, the essentials of the old 'containment' policy will probably be continued, and areas of strength will be reinforced."–'न्यू यॉर्क टाइम्स', १५ मार्च १९५३.—याचा अर्थ हाच कीं ट्रूमन-ॲचेसन-कारकीर्दीमध्यें जें धोरण आंखलें होतें तेंच थोडें सामर्थ्य वाढवून नवी राजवट चालविणार.








दोस्तराष्ट्रांच्या विरोधापुढें रिपब्लिकन पक्षाचें 'विमोचक' धोरण प्रभावी होऊं शकत नाहीं हें तर खरेंच; पण या धोरणाचाच खरा अर्थ अद्याप निश्चित होऊं शकला नाहीं. निवडणूक-मोहिमेमध्यें विजय मिळविण्याला उपयोगी ठरेल अशा रीतीनें रिपब्लिकन पक्षानें नव्या धोरणाची घोषणा केली. पण या धोरणाचा पुरा अन्वयार्थ त्या वेळेलाहि स्पष्ट झाला नाहीं व त्यानंतरहि त्याचें विशदीकरण होऊं शकलें नाहीं. धोरणाच्या स्वरूपाची अ-निश्चितता हेंहि तें धोरण प्रभावी न होण्याचें एक कारण आहे.

रिपब्लिकन पक्षांतर्गत दुफळी हेंहि नवें नेतृत्व प्रभावी न होण्याचें आणखी एक कारण आहे. या दुफळीचें एक उदाहरण नुकतेंच घडलें आहे. युद्धकालीन—याल्टा, पोट्स्डॅम इ.—गुप्त करारांचें रशियानें विडंबन केलें असल्यामुळें ते करार अमेरिका बंधनकारक मानणार नाहीं असा ठराव आयसेनहॉवरनें काँग्रेसकडे पाठविला. परराष्ट्रीय धोरणाबाबतचा हा ठराव असल्यामुळें, तो दोन्ही पक्षांच्या पाठिंब्यानें व शक्य तर एकमतानें पास व्हावा अशी राज्यकर्त्यांची इच्छा असल्यामुळें, त्यांनीं ट्रूमन अथवा रूझवेल्ट यांच्यावर हे गुप्त करार केल्याचा दोषारोप येणार नाहीं अशा बेतानें ठरावाची सौम्य शब्दरचना केली होती. परंतु रिपब्लिकन पक्षांतील बऱ्याच जुन्या सभासदांना हें पसंत पडलें नाहीं व त्यांनीं मागील राजवटीवर ठपका येईल अशी शब्दरचना करण्याचा आग्रह धरला. त्यामुळें शेवटीं राज्यकर्त्यांना हा ठरावच बेमुदत तहकूब ठेवण्याशिवाय गत्यंतर उरलें नाहीं. या प्रकरणांत सरकारला माघार घ्यावी लागली आणि आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या क्षेत्रांत पुढाकार घेण्याचें सरकारनें ठरविल्यास पक्षांतर्गत दुफळीमुळें तें सहजासहजीं कसें शक्य होणार नाहीं हेंहि उघड दिसून आलें.

राजकीय पक्षभेद, पक्षांतर्गत मतभेद, सहकारी संघटनांचा विरोध या अडचणी लोकशाही पद्धतीमध्यें अपरिहार्यच मानल्या पाहिजेत. अँग्लोअमेरिकन गटाचा कारभार राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय जीवनामध्यें लोकशाही पद्धतीवर आधारलेला असल्यामुळें, त्याच्या कार्यपद्धतीमध्यें या अडचणी न आल्या तरच नवल. आंतरराष्ट्रीय राजकारणांत लोकशाही राष्ट्रांपेक्षां हुकूमशाही राष्ट्रें जास्त कार्यक्षमतेनें आपलें धोरण चालवूं शकतात याचें मुख्य कारण म्हणजे हुकूमशाही राष्ट्रांना या मतभेदांच्या अडचणी जाणवत नाहींत, हेंच होय. लोकशाही राष्ट्रांना परराष्ट्रीय धोरणामध्यें सहजासहजीं बदल करतां येत नाहीं. कारण त्यांना जनतेपुढें जाब द्यावा लागतो आणि अनेक गट व संघटित पक्ष यांच्या टीकेपुढें आपल्या धोरणाचें समर्थन करावें लागतें. यामुळेंच लोकशाही राष्ट्रांच्या परराष्ट्रीय धोरणामध्यें एक प्रकारचें सातत्य आढळतें. डावपेंच खेळण्याच्या दृष्टीनें ही मोठीच अडचण आहे. परंतु ती अपरिहार्य आहे. या उलट, हुकूमशाही राष्ट्रांना आधीं धोरण ठरवून मग तें लोकांच्या गळीं उतरविण्याची शक्यता जास्त असल्यामुळें, परराष्ट्रीय संबंधाबाबत त्यांना सहज सुलभतेनें डावपेंच खेळतां येतात.[५] आंतरराष्ट्रीय राजकारणामध्यें रशियाच्या नेतृत्वाखालील कम्युनिस्ट सत्तागटाला जितक्या लीलेनें डावपेंच खेळतां येतात तितकेंच अँग्लोअमेरिकन गटाला आपलें धोरण बदलणें जड जातें. दोन सत्ता-गटांच्या कार्यपद्धतींतील मूलभूत फरकाचे आंतरराष्ट्रीय क्षेत्रावर उमटणारे हे पडसाद आहेत.

## रशियाच्या धोरणांतील नवा बदल

अमेरिकेचें नवें नेतृत्व आपल्या नव्या धोरणाच्या दिग्दर्शनामुळें उडालेल्या खळबळीच्या प्रतिक्रियांमधून बाहेर पडायच्या आंतच मार्शल स्टॅलिन निधन पावून रशियाच्या व पर्यायानें कम्युनिस्ट सत्ता-गटाच्या नेतृत्वामध्यें एकदम बदल घडून आला. स्टॅलिनच्या निधनामुळें रशियाच्या अंतर्गत व्यवस्थेवर किंवा धोरणावर काय परिणाम होतील याचा नक्की अंदाज आज करतां येणें शक्य

५ उदा.—१९३९ चा रूसो-जर्मन अनाक्रमणाचा करार. या उलट होअर-लावाल कराराची प्रतिक्रिया अभ्यासावी.








नाहीं. परंतु रशियाच्या नव्या राजवटीची रचना ज्या पद्धतीनें करण्यांत आली त्यावरून स्टॅलिनच्या मागून रशियांतील अंतर्गत व्यवस्थेमध्येंहि बदल घडून येण्याची शक्यता आहे असें वाटतें. गेलीं कित्येक वर्षें रशियाचें नेतृत्व स्टॅलिन या एका व्यक्तीमध्यें केंद्रित झालें होतें. रशियन सरकारचा पंतप्रधान आणि कम्युनिस्ट पक्षाचा सरचिटणीस हे दोन्ही अधिकार स्टॅलिनकडेच होते आणि राजकीय सत्तेचें एका व्यक्तीमध्यें केंद्रीकरण झाल्याचेंच हें प्रत्यंतर होतें. स्टॅलिननंतर त्याचा अधिकार त्याच्या अनुयायांमध्यें विभागला जाऊन एकाऐवजीं तीन पुढारी आतां रशियाचें नेतृत्व करीत आहेत. मॅलेन्कोव्ह हा रशियाचा पंतप्रधान म्हणून स्टॅलिनचा वारस झाला तरी कम्युनिस्ट पक्षाचें चिटणीसपद त्यानें सोडलें ही गोष्ट अगदींच अनुल्लेखनीय नाहीं. हुकुमशाहीला सत्तेचें केंद्रीकरण आवश्यक असतें आणि त्या दृष्टीनें स्टॅलिनचा अधिकार, वर्चस्व व दरारा हा सर्व त्याच्या वारसाकडे गेला नाहीं तर सत्ताविभागणीमुळें नव्या हुकुमशहाचें आसन स्थिर होऊं शकणार नाहीं. रशियाच्या वरिष्ठ सरकारी यंत्रणेमध्यें जो नव्यानें फेरबदल करण्यांत आला तोहि केवळ औपचारिक म्हणून दुर्लक्षितां येणार नाहीं. रशियांतील कम्युनिस्ट पक्षाचें सर्वश्रेष्ठ कार्यकारीमंडळ जें प्रेसिडिअम त्याची रचना, कम्युनिस्ट पक्षाच्या गेल्या ऑक्टोबर मधील अधिवेशनामध्येंच स्टॅलिननें ठरवून विस्तृत केली होती. या प्रेसिडिअमचा नव्या राजवटीमध्यें संकोच करण्यांत आला आहे. नव्या राजवटीच्या अंतर्गत धोरणाचें जें थोडें दिग्दर्शन गेल्या कांहीं दिवसांत झालें आहे तेंहि स्टॅलिनच्या धोरणांत कांहीं बदल होणार नाहीं या कल्पनेला खास पोषक नाहीं. कैद्यांची मोठ्या प्रमाणावर सार्वत्रिक मुक्तता करण्यांत आली ही गोष्ट सोव्हिएट रशियाच्या कारकीर्दीमध्यें अपूर्वच आहे.[६] पण ज्या घटनेमुळें जगाला आश्चर्याचा धक्का बसला ती म्हणजे रशियाच्या मोठमोठ्या पुढाऱ्यांना मारण्याचा कट केल्याच्या आरोपावरून गेल्या जानेवारींतच शिक्षा केलेल्या डॉक्टरांची मुक्तता ही होय. या डॉक्टरलोकांमध्यें बरेचसे ज्यू डॉक्टर्स होते आणि डॉक्टरांवर खुनाच्या कटाचा आरोप ठेवून त्यांना देण्यांत आलेली शिक्षा ही ज्यू-विरोधी मोहिमेची सुरुवात होय, असा या घटनेचा अर्थ टीकाकारांनीं लावला होता. सोव्हिएट रशियांतील रूढ पद्धतीप्रमाणें या गुन्हेगारांचे कबुलीजबाब मिळविण्यांत आले होते आणि कटाचा छडा लावण्याची कामगिरी करणाऱ्या महिलेला लेनिन पारितोषिक देण्यांत आलें होतें. या सर्व घटना स्टॅलिनच्या अमदानींत झाल्या होत्या. पण गेल्या महिन्यांत रशियन सरकारनें या सर्व डॉक्टरांना निर्दोष व निष्कलंक ठरवून मुक्त केलें व अत्यंत आश्चर्याची गोष्ट म्हणजे या डॉक्टरांच्या बाबतींत अंतर्गत सुरक्षाखात्यानें बेकायदेशीर व चुकीच्या मार्गाचा अवलंब केला असा स्पष्ट दोषारोप तत्संबद्ध अधिकाऱ्यावर ठेवण्यांत आला ! रशियन कायद्याला संमत नाहीं अशा पद्धतीनें डॉक्टरांचे कबुलीजबाब घेण्यांत आले असें 'प्रवदा' पत्रानें म्हटलें आहे.[७] रशियन नेत्यांनीं आपली चूक कबूल केल्याचें हें पहिलेंच उदाहरण

---

६ सोव्हिएट रशियाप्रमाणेंच रुमानिया या कम्युनिस्ट राष्ट्रानेंहि ४ एप्रिल रोजीं कैदीमुक्ततेचा कार्यक्रम जाहीर केला. निरीक्षकांच्या मतें रशियाच्या सूचनेवरूनच रुमानियामध्यें हा हुकूम निघाला असावा.

७. " The verification has shown that the charges against those persons were false and the documentary data, on which the investigation workers based themselves, were groundless. It has been established that the testimony of the arrested, allegedly confirming the charges profferred against them, was obtained by workers of the investigation section of the former Ministry of State Security through the use of methods of investigation which are inadmissible and most strictly forbidden by

[ पान २८ वर चालू

असेल. आणि हें जर नव्या धोरणाचें निदर्शक असेल, तर स्टॅलिनच्या निधनामुळें रशियाच्या अंतर्गत व्यवस्थेवर व धोरणावर कांहींच परिणाम होणार नाहीं असें म्हणणें निःसंशय चुकीचें ठरेल.

स्टॅलिनच्या निधनाचे जागतिक परिस्थितीवर होणारे परिणाम जगाच्या दृष्टीनें अर्थातच जास्त महत्त्वाचे आहेत. त्यासंबंधीं सर्व राष्ट्रांमध्यें–विशेषतः पाश्चात्त्य राष्ट्रांमध्यें–अनेक तर्ककुतर्क चालू आहेत. आणि हे पुष्कळसे परस्परविरोधी आहेत. स्टॅलिनच्या निधनामुळें रशियाच्या नेत्यांचें लक्ष अंतर्गत प्रश्नांवर केंद्रित होईल व त्यामुळें नजीकच्या भविष्यकाळांत संघर्ष वाढण्याचा संभव कमी आहे अशी एक विचारसरणी आहे. या उलट कांहींच्या मतें, रशियाच्या अंतर्गत राज्यकारभारामध्यें सत्तेसाठीं जो लढा अटळ आहे त्यावरून जनतेचें लक्ष डावलण्यासाठीं नवें नेतृत्व जागतिक युद्धाचा डाव मांडील. अर्थात्, स्टॅलिनच्या मृत्यूमुळें युद्धाची शक्यता वाढली आहे असें या टीकाकारांचें मत आहे. अर्थात्, आयसेनहॉवर यांनीं पत्रकारपरिषदेपुढें सांगितल्याप्रमाणें रशियाच्या भावी धोरणासंबंधीं पाश्चात्त्य मुत्सद्द्यांना तर्क करण्यापलीकडे कांहीं करणें शक्यच नाहीं (पाहा : 'न्यूयार्क टाइम्स' ८।३।५३).

## रशियाची शांततेची चढाई

पोलादी पडद्यामागील धोरणामध्यें आकस्मिक बदल होणें ही गोष्ट फारशी कठीण नाहीं याचें विवेचन मागें झालेंच आहे. याची पुरेशी प्रचीति गेल्या कांहीं दिवसांतील रशियाच्या आंतरराष्ट्रीय संबंधांतील बदललेल्या धोरणावरून येऊं शकते. स्टॅलिनच्या निधनामुळें होणाऱ्या परिणामांबद्दल तर्क करीत बसलेल्या परदेशीय निरीक्षकांना व मुत्सद्द्यांना आणखीच बुचकळ्यांत टाकून, रशियाच्या नव्या नेत्यांनीं सुरू केलेल्या शांततेच्या चढाईनें आंतरराष्ट्रीय राजकारणांत थोडीबहुत गोंधळाची परिस्थिति निर्माण केली आहे. स्टॅलिनच्या अंत्यसंस्कारप्रसंगीं त्याच्या राजकीय वारसांनीं जीं भाषणें केलीं तेव्हांपासून क्रमाक्रमानें पण निश्चित योजनेनुसार जागतिक शांततेची चढाई रशियाच्या नव्या नेत्यांनीं सुरू केली आहे. स्टॅलिनचें धोरण बरेचसें नेमस्त होतें व त्यानें रशियांतील युद्धप्रवृत्तीला काबूंत ठेवून जागतिक शांततेला हातभार लावला ही विचारसरणी स्टॅलिनसंबंधीं मृत्युलेखांतून व्यक्त होत होती,[८] आणि स्टॅलिनच्या मृत्यूमुळें रशियांतील युद्धप्रवृत्ति काबूंत ठेवणारी शक्ति नाहींशी झाल्याकारणानें रशियांतील नव्या राजवटीच्या धोरणाबद्दल चिंतायुक्त अनिश्चितता व्यक्त केली जात होती. पण नव्या राजवटीच्या धोरणानें ही परिस्थिति अजिबात पालटली आहे.

सुप्रीम सोव्हिएटच्या खास बैठकीपुढें १५ मार्च रोजीं रशियाचे नवे पंतप्रधान मॅलेंकोव्ह यांनीं जें भाषण केलें त्यांत रशियाच्या परराष्ट्रीय धोरणाबद्दल बोलतांना त्यांनीं शांततेच्या चढाईची मोहीम सुरू केली. भांडवलशाही व साम्यवादी अर्थव्यवस्था व समाजरचना परस्परांच्या शेजारीं गुण्यागोविंदानें नांदूं शकतात असें सांगून मॅलेंकोव्ह म्हणाले कीं, जगांत असा एकहि प्रश्न नाहीं कीं, जो शांततेच्या मार्गानें किंवा तडजोडीनें सुटणार नाहीं. रशियाच्या धोरणाचा शांतिपाठ मॅलेंकोव्ह यांनीं या भाषणांत गायिला तरी सोव्हिएट मुत्सद्द्यांच्या घोषणांचा मागील अनुभव लक्षांत घेऊन या नव्या भाषणाला फारसें महत्त्व कोणीं

---

तळटीप ७, पान २७ वरून पुढें चालू.]

Soviet law." हा 'प्रवदा'च्या अग्रलेखांतील उतारा आहे. समग्र अग्रलेख 'न्यू यॉर्क टाइम्स'च्या ७ एप्रिलच्या अंकांत छापला आहे. डॉक्टरांची मुक्तता ही डॉयशरच्या मतें सोव्हिएट रशियामध्यें होऊं घातलेल्या प्रचंड उलथापालथीची सुरुवात आहे. : 'Russia after Stalin.'—'टाइम्स ऑफ इंडिया', १९ एप्रिल १९५३.

८ उदा०—डॉयशर या स्टॅलिनच्या चरित्रकाराचा लेख पाहा : 'टाइम्स ऑफ इंडिया,' ११ मार्च १९५३. तसेंच 'न्यू यॉर्क टाइम्स' ८ मार्च १९५३ पहा.











# जागतिक राजकारणाचा बदललेला रागरंग

दिलें नाहीं. अमेरिकेमध्यें तर शब्दाला कृतीची जोड पाहिजे अशा अर्थाचें आव्हान रशियाच्या नेत्यांना देण्यांत आलें. पण मॅलेंकोव्ह यांचें भाषण ही केवळ सुरुवात होती असें ठरविणाऱ्या घटना पुढें घडूं लागल्या. उत्तर कोरियाच्या ताब्यांत गेलीं तीन वर्षे अडकलेल्या ब्रिटिश व फ्रेंच नागरिकांना सोडविण्याबद्दल रशियन सरकार रदबदली करील असें रशियाच्या परराष्ट्रमंत्र्यानें १८ मार्च रोजीं ब्रिटिश व फ्रेंच परराष्ट्रखात्यांना कळविलें. पश्चिम जर्मनीच्या परिसरांत रशियन विमानांतून झालेल्या गोळीबारामुळें ब्रिटिश विमान खालीं पडून ब्रिटिश सैनिक ठार झाले याबद्दल बर्लिनमधील रशियन प्रतिनिधि जनरल च्यूइकॉव्ह यानें १९ मार्च रोजीं खेदप्रदर्शक खलिता पाठविला व असे प्रसंग पुनः होऊं नयेत म्हणून ब्रिटिश प्रतिनिधींबरोबर बोलणीं करण्याची सूचना केली आणि पुढें फ्रेंच व अमेरिकन प्रतिनिधींना या बोलण्यांत सामील करून घ्यावें अशीहि सूचना केली. २१ मार्च रोजीं मॉस्को रेडिओवरून युद्धकाळामध्यें बड्या तिघांचें जें सहकार्य होतें त्याचें स्तुतिपर वर्णन करण्यांत येऊन, हीं सर्व राष्ट्रें शांततामय सहकार्याचें जीवन जगूं शकतील असा प्रचार करण्यांत आला. हा शांतिपाठ तेव्हांपासून रशियानें चालू ठेवला आहे व इतर देशांतील कम्युनिस्ट पक्षहि त्याचीच री ओढूं लागले आहेत.

परंतु हा प्रचार किंवा या शांतिपाठाच्या घोषणा यांना महत्त्व प्राप्त झालें याचें कारण कोरियांतील युद्धकैद्यांबाबत रशियानें नवें धोरण पत्करून शब्दाला कृतीची जोड देण्याचें ठरविलें हेंच होय. जखमी व आजारी युद्धकैद्यांची अदलाबदल जिनीव्हा कराराप्रमाणें व्हावी ही संयुक्त राष्ट्रांच्या सेनानींची सूचना चीन व उत्तर कोरियाच्या सरकारांनीं २८ मार्च रोजीं मान्य केली; एवढेंच नव्हे तर, त्यानंतर दोनच दिवसांनीं चीनच्या मुख्य प्रधानांनीं कोरियाच्या युद्धकैद्यांचा सर्वच प्रश्न सामोपचारानें सोडविण्याची शक्यता आहे असें सांगून, युद्धकैद्यांच्या अदलाबदलीबाबतची पूर्वीची आग्रही भूमिका सोडण्याची तयारी दर्शविली. चीनच्या या नव्या सूचनेचा रशियन परराष्ट्रमंत्र्यांनीं जोरानें पुरस्कार केला आणि कोरियांतील युद्ध थांबविण्याचा हा प्रयत्न रशियन सरकारच्या नव्या धोरणाचाच एक भाग आहे ही गोष्ट स्पष्ट झाली. दि. १ एप्रिल रोजीं परराष्ट्रमंत्री मॉलोटोव्ह यांनीं एक पत्रक काढून चीनच्या योजनेशीं रशियन सरकार पूर्णपणें सहमत आहे असें तर जाहीर केलेंच, पण शिवाय अमेरिकन सरकार ही योजना बरोबर समजावून घेईल असा आशावादहि प्रकट केला. याच वेळेला संयुक्त राष्ट्रांच्या सरचिटणीसपदासाठीं करावयाच्या निवडीबाबत सुरक्षासमितींतील बड्या पांच राष्ट्रांमध्यें जो पेंचप्रसंग निर्माण झाला होता तोहि रशियानें हॅमरशील्ड या स्वीडिश अर्थशास्त्रज्ञाच्या नांवास मान्यता देऊन सोडविण्यास मदत केली. संयुक्त राष्ट्रांच्या कार्यामध्यें रशिया व कम्युनिस्ट गटांतील इतर राष्ट्रें यांनीं पूर्वींचें अडवणुकीचें धोरण बदललें आहे असें गेल्या कांहीं दिवसांच्या अनुभवावरून स्पष्ट होतें. अमेरिकन वार्ताहरांना रशियन सरकारनें आपल्या देशांत हिंडण्याबद्दल व बाहेर देशीं बातमीपत्रें, फोटो वगैरे सेन्सॉर न करतां पाठविण्याच्या सवलती दिल्या, मॉस्कोमधील अमेरिकन वकिलातीच्या सामाजिक समारंभामध्यें रशियन परराष्ट्रखात्यांतील अधिकाऱ्यांनीं मोकळेपणानें भाग घेतला—या घटना एरव्हीं क्षुल्लक वाटल्या तरी रशियाच्या धोरणामधील योजनापूर्व बदल दर्शविण्याच्या दृष्टीनें खासच सूचक आहेत.

रशियाच्या धोरणांतील या मोठ्या बदलाचा अन्वयार्थ काय हाच पाश्चिमात्य राष्ट्रांतील मुत्सद्द्यांना आणि निरीक्षकांना मोठा प्रश्न पडला आहे. दोस्तराष्ट्रांत फूट पाडण्याच्या हेतूनें हें नवें धोरण आंखलें आहे काय ? किंवा नव्या राजवटीला स्थैर्य लाभावें म्हणून अवधि पाहिजे, तोंपर्यंत पाश्चात्त्य राष्ट्रांच्या लष्करी सामर्थ्याची वाढ थांबवावी या दृष्टीनें हें तडजोडीचें धोरण आंखलें आहे ? किंवा रशियाच्या नव्या नेत्यांना खरोखरच शांतता प्रस्थापित करण्याची इच्छा असून प्रामाणिकपणें तडजोड पाहिजे ? का जर्मनीचें लष्करीकरण व पश्चिम युरोपचें संघीकरण थांबविण्यासाठीं टाकलेला हा








डाव आहे ? [१] या पद्धतीनें विचार करून रशियाच्या नव्या पुढाऱ्यांच्या हेतूबद्दल खात्रीलायक अंदाज करणें कठीण आहे. रशियाच्या अंतर्गत व्यवस्थेमध्यें व धोरणामध्यें जे फेरफार झाले व चालू आहेत त्यामुळें आंतरराष्ट्रीय धोरणामधील फरक हा निव्वळ एक डावपेंच असेल असें वाटत नाहीं. सर्वच क्षेत्रांत एका नव्या दिशेनें धोरण आंखावें असा रशियाच्या नव्या नेत्यांचा विचार दिसतो.

## जागतिक शांतीची शक्यता वाढली आहे

आपल्या नव्या धोरणानें रशियानें अँग्लो-अमेरिकनसत्ता-गटालाच अडचणींत टाकलें आहे. विशेषतः अमेरिकेच्या नव्या राज्यकर्त्यांना आपल्या परराष्ट्रीय धोरणाचा फेरविचार करावा लागेल. शीत युद्धाच्या तीव्रतेमुळें आणि रशियाच्या प्रचंड लष्करी वर्चस्वाच्या भीतीमुळें अँग्लोअमेरिकन गटांतील राष्ट्रांनीं आपली एकजूट टिकविण्यासाठीं व अमेरिकेचें साहाय्य चालू ठेवण्यासाठीं कांहीं मतभेदाच्या प्रश्नांवर पडदा टाकला होता. परंतु या प्रश्नांबद्दल कांहीं तरी निश्चित निर्णय घेणें हें नव्या परिस्थितींत अपरिहार्यच होईल. कोरियांतील युद्धाबाबत तडजोड होण्याची शक्यता खूपच बळावली आहे. पण कोरियामध्यें युद्धबंदीबाबत तडजोड झाली तर महत्त्वाचे राजनैतिक प्रश्न व आर्थिक समस्या अमेरिकेला भेडसावतील. जपानबाबत कोणतें धोरण स्वीकारावयाचें ? जपान व लाल चीन यांचे व्यापारी संबंध कसे राहूं द्यावयाचे ? फोर्मोसाचें भवितव्य काय ? संयुक्त राष्ट्रांत लाल चीनला प्रतिनिधित्व द्यावयाचें किंवा नाहीं ? जर्मनीचें एकीकरण करावें व तेथील परराष्ट्रांच्या फौजा काढून घ्याव्यात अशी मागणी रशियाची असणार त्याला काय उत्तर द्यावयाचें ? अमेरिकन अर्थव्यवस्थेवर युद्धबंदीचे जे परिणाम होतील त्यांबाबत काय उपाययोजना करावयाची ?—हे व असेच इतर गंभीर प्रश्न दोस्तराष्ट्रांना सोडवावे लागतील. स्टॅलिनच्या कारकीर्दीमध्यें रशियाच्या धोरणासंबंधीं जीं गृहीत कृत्यें मानून अमेरिकन परराष्ट्रखातें आपलें धोरण आंखूं पाहात होतें त्यामध्यें स्टॅलिनच्या मृत्यूमुळें मोठ्या प्रमाणावर बदल करणें भाग पडणार आहे. नव्या बदललेल्या परिस्थितीची दखल घेऊन सर्व दोस्तराष्ट्रांच्या सहकार्यानें रशियाच्या या शांततेच्या चढाईला तोंड देण्याची अतिशय अवघड कामगिरी अमेरिकेच्या नव्या नेतृत्वावर आली आहे. आणि कांहीं काळ तरी आंतरराष्ट्रीय राजकारणांत अमेरिकेचे नेते चांचपडत राहिल्यास आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

रशियाची शांततेची चढाई हेंच कम्युनिस्ट सत्ता-गटाचें आंतरराष्ट्रीय राजकारणांतील नवें धोरण होय. आपला पवित्रा बदलतांना या सत्ता-गटाला कोणतीच विशेष अडचण आली नाहीं. कांहीं अंतर्गत अडथळे येतील अशीहि शक्यता नाहीं. आंतरराष्ट्रीय राजकारणांत पुढाकार घेण्याचा अमेरिकेच्या नव्या राज्यकर्त्यांचा प्रयत्न कसा प्रभावी होऊं शकला नाहीं याचें विवेचन वर आलेंच आहे. उलट, स्टॅलिनच्या निधनामुळें निर्माण झालेल्या परिस्थितींत रशियाच्या नव्या नेत्यांनीं शांततेची चढाई सुरू करून आपणच पुढाकार घेतला आहे. स्टॅलिनच्या निधनामुळें जागतिक शांततेची शक्यता वाढली आहे हें अमेरिकन परराष्ट्रमंत्र्यांचें विधान खरें ठरूं पाहात आहे. पण त्याचें कारण जागतिक राजकारणाचीं सूत्रें स्टॅलिनच्या हातून आयसेनहॉवरच्या हातीं गेलीं हें नसून—कारण तीं तशीं गेलीं नाहींत—स्टॅलिननंतर त्याच्या रशियांतील वारसांनीं अगदीं निराळें असें—शांततेच्या चढाईचें—धोरण स्वीकारलें हेंच द्यावें लागेल. जागतिक शांततेच्या दृष्टीनें परिणामकारक उपाययोजना अंमलांत आणून आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत अमेरिका पुढाकार घेऊं शकेल, तेव्हांच स्टॅलिनयुग संपून आयसेनहॉवरयुग सुरू झालें असल्या आशावादाला कांहीं अर्थ येईल.

---

१. डलेस यांच्या मतें आयसेनहॉवर राजवटीनें जें नवें जोरदार धोरण पुरस्कारिलें त्यामुळेंच रशियन नेत्यांनीं आपलें धोरण बदललें असावें. युगोस्लाव्हियांतील निरीक्षकांच्या मतें स्टॅलिननंतर रशियन राजवटीमध्यें भेदप्रक्रिया सुरू झाली असून, रशियाचें नवें धोरण हें अंतर्गत अडचणींचें निदर्शक आहे. आयझॅक डॉयशरच्या मतें, स्टॅलिनचे वारस क्रमाक्रमानें स्टॅलिनवादाला मूठमाती देत आहेत.












श्री. प्रेमा कंटक

# रमणीय असम

भारताच्या ईशान्य कोपऱ्यांत हिमालयाच्या दक्षिणेस एक रमणीय प्रदेश आहे. भारताचा भूगोल लहानपणीं शिकतांना त्याचें नांव घोकलें जातें व नंतर तितक्याच सुलभतेनें विसरलेंहि जातें! आमचे नवयुवक व नवयुवती शालेय शिक्षण संपल्यावर किंवा उच्च शिक्षणाचा लाभ घेतल्यावर परदेशची मुशाफरी करण्यास अत्यंत उत्सुक असतात. परंतु खुद्द आपल्या देशांत किती विविध प्रदेश आहेत, किती पावन क्षेत्रें आहेत, गगनचुंबी पर्वत, रमणीय सरोवरें, पवित्र नद्या यांच्या रूपानें वैभव, कीर्ति, कला व सौंदर्य यांची ईश्वरानें मुक्तहस्तानें किती खैरात केली आहे त्याची गंधवार्ताहि कोणास नसते! आपल्या या विशाल देशाची असाधारणता किती आहे ह्याची कल्पना आम्हां हिंदी लोकांना देखील नाहीं. दक्षिण टोंकास कन्याकुमारी, उत्तरेकडे गौरीशंकर व मानससरोवर आणि यांच्या दरम्यान भिन्न भिन्न प्राकृतिक सौंदर्याचे व भव्यतेचे नमुने सादर करणारीं सहस्रधारा, श्रीनगर, भेडाघाट, नर्मदातट, जोगचा धबधबा, माथेरान-महाबळेश्वर आदि स्थळें पाहून सृष्टिकर्त्याचा विभूतियोगच जणुं चर्मचक्षूंनीं पाहात आहोंत असें प्रेक्षकांना वाटतें! भारतांतील सृष्टि कामरूपिणी आहे. तिच्या विविधतेला अंत नाहीं. त्यामुळें तिचे प्राचीन उपासक पृथ्वीप्रदक्षिणेचें पुण्य गात गात आर्यावर्तांत पायीं पर्यटन करीत असत.

आजहि पायीं पर्यटन करण्याचें युग सुरू झालें आहे. मरणोत्तर मोक्ष मिळविण्यासाठीं नव्हे, तर याच लोकीं स्वर्ग निर्माण करण्यासाठीं! विनोबाजींनीं भूदान-यज्ञाचें कुंड प्रज्वलित केलें आहे. त्याला त्यांनीं लोकसूय यज्ञ असें नांव दिलें आहे. आणि त्या यज्ञांत आहुति टाकण्यासाठीं लोक-मानस तयार करावें म्हणून ते स्वतः पायीं फिरत आहेत व इतरांनाहि तसेंच करण्यास प्रेरीत आहेत. सर्व-सेवा-संघानें विनोबाजींच्या संकल्पास राष्ट्रव्यापी स्वरूप दिलें आहे. १९५२ च्या एप्रिल महिन्यांत सेवापुरी येथें सर्वोदय-संमेलन भरलें तेव्हां दोन वर्षांत पंचवीस लाख एकर जमीन दान म्हणून मिळविण्याचा संकल्प जाहीर करण्यांत आला. सर्व-सेवा-संघाचे व सर्वोदय-समाजाचे मंत्री श्री. शंकरराव देव यांनीं तो अंमलांत आणण्यासाठीं सर्व प्रदेशांतून स्वतः पायीं हिंडून या कामास चालना द्यावयाचें ठरविलें. त्याप्रमाणें ते महाराष्ट्र, हैदराबाद, तमिळनाडु, केरळ, राजस्थान, मध्यप्रदेश इतक्या प्रांतांतून हिंडले व हजारों एकर जमीन त्यांनीं मिळविली. गेल्या मार्च महिन्याच्या ७।८।९ तारखांस बिहार प्रदेशांत चांडिल येथें सर्वोदय संमेलन भरणार होतें व त्यानंतर असम प्रदेशांत पदयात्रा करण्याचा त्यांचा कार्यक्रम निश्चित झाला होता.

सर्वोदय-संमेलनास नेहमीं हजर राहण्याचा माझा प्रघात आहे. यंदां चांडिलकडे रवाना होतांना मनाशीं ठरविलें होतें कीं, संमेलन आटोपल्यावर श्री विनोबाजींबरोबर कांहीं दिवस फिरून यावयाचें. या गोष्टीस श्री. विनोबाजींची संमतिहि मिळाली होती. पण ईश्वरी संकेत वेगळा होता. शंकररावांना कांहीं दिवसांपुरतें मला सोबत नेण्याची आवश्यकता भासण्यासारखी परिस्थिति निर्माण झाली व त्यांची अडचण पाहून मलाहि माझा पूर्वसंकल्प सोडून द्यावा लागला. त्यामुळें १२ मार्च रोजीं सकाळीं विनोबाजींबरोबर बिहार प्रदेशांत भ्रमण करण्यास जाण्याऐवजीं शंकररावांबरोबर असमची पदयात्रा करण्यास मी रात्रीं कलकत्त्याकडे रवाना झाल्यें.

पूर्वबंगाल पाकिस्तानांत गेल्यामुळें कलकत्त्याहून असमकडे जाण्याचा आगगाडीचा नजिकचा रस्ता बंद झाला आहे. बिहारमधून दोन-तीन दिवस रखडत गाडी-प्रवास तरी करावा किंवा कलकत्त्याहून विमानानें उड्डाण करून जावें असे दोन पर्याय आहेत. असम प्रदेशांतील मुख्य शहर गुवाहाटी हें कलकत्त्याहून विमानानें दोन तासांच्या








अंतरावर आहे. पूर्वयोजनेप्रमाणें शंकररावांचा दौरा गुवाहाटीपासून सुरू होणार होता. परंतु १२ मार्च रोजीं त्या भागांत निवडणूक होणार होती त्यामुळें दौऱ्याचा कार्यक्रम बदलून उलटा करण्यांत आला. म्हणजे सुरुवातीचें टोंक शेवटीं व शेवटचें आरंभीं ठेवण्यांत आलें. म्हणून आम्हांला विमानानें डिब्रूगढला जावें लागलें. दौरा तेथून सुरू झाला. त्याची अखेर गुवाहाटीस होण्याचें ठरलें.

आम्ही १५ मार्च रोजीं सकाळीं डिब्रूगढ जिल्ह्यांतील मोहनवाडी या विमानतळावर उतरलों. कलकत्त्याच्या डमडम विमानतळापासून मोहनवाडीला पोंचण्यास सुमारें साडेतीन तास लागले. मध्यें एकदां विमान गुवाहाटीस कांहीं मिनिटें थांबलें होतें. विमानांतून खालचा प्रदेश अस्पष्ट पण रमणीय दिसत होता. एकाद्या कुशल मूर्तिकारानें माती, काष्ठ, पाषाण व पाणी घेऊन त्यांतून कलेचा सुंदर परस्परसंवादी संगम उत्पन्न करावा त्याप्रमाणें भास होत होता ! जणुं काय आपण सौष्ठव, शांति आणि शक्ति यांचें साम्राज्य पसरलेल्या एका पऱ्यांच्या साम्राज्यावरून अंतराळांतून जात आहों असें वाटत होतें ! खालची अद्भुत नगरी शांत व झोपलेली वाटत होती. माणसें किंवा प्राणी दिसत नव्हते. पृथ्वीवरून चंद्रलोक कसा वाटतो ? अंतराळांतून पृथ्वीहि झोपल्यासारखी वाटते ! धरतीमातेच्या अंकावर बसून सृष्टीशीं गुजगोष्टी करतां येतात, तिची भव्यता, चारुता, प्रेम यांची प्रतीति होते हें सत्य आहे. अंतराळांतून ती पडद्याआड राहून आपलें दर्शन दुरून व अस्पष्ट देत आहे, हेंहि कळतें. भावनेऐवजीं कुंचल्याचीच कला विमानांतून दृष्टोत्पत्तीस येते।

पुढें जेव्हां ब्रह्मपुत्रेचा विशाल पट दृष्टीस पडला तेव्हां मन भावनांनीं उचंबळून गेलें ! वरून नदीची रुंदी विशाल वाटत नव्हती पण तिचें वैशिष्ट्य नजरेंत भरत होतें. तिच्या आसपास अफाट वाळवंटें पसरलेलीं मधूनमधून दिसत होतीं. डोंगर-पर्वतांचीं शिखरें, त्यांतून अस्पष्ट दिसणारीं शिलाखंडें आणि शुभ्र ढगांचे झिरझिरित पडदे व खालच्या शिखरांवर त्यांची पडलेली छाया यांमुळें कवितादेवीच्या साम्राज्यांत तरंगत चालल्याचा भास झाला !

गुवाहाटीच्या विमानतळावर उतरलों तेव्हां पडद्याआड असलेली सृष्टि स्मितहास्य करीत सन्मुख झाली ! चित्ताला समाधान वाटलें. सृष्टीनें नवेंच रूप धारण केलें होतें ! ती चैतन्यमयी बनली होती. समोर व आसपास जिवंत वनस्पतिसृष्टि सर्वत्र पसरली होती. सभोंवतीं वेढून राहिलेले डोंगर, अरण्यें, कुरणें, शेतें जिकडे पाहावें तिकडे हिरवेंगार दिसत होतें ! असम प्रदेशाच्या रमणीयतेचें असें प्रथम सुभग दर्शन झालें !

इंग्रज लोकांनीं ज्याला आसाम हें नांव दिलें तो प्रदेश प्राचीनकाळीं प्राग्ज्योतिष या नांवानें ख्यात होता. परशुरामानें आपल्या परशूनें ज्याचे सहस्र बाहू तोडले तो सम्राट् सहस्रार्जुन याच देशाचा धराधीश होता. भारतीय युद्धांत हत्तीवर बसून दुर्योधनाच्या बाजूनें लढणारा राजा भगदत्त याच प्रदेशांत राज्य करीत होता. या प्रदेशांत अरण्यें व हत्ती फार आहेत. या प्रदेशाचा आकार कांहींसा उलट्या त्रिकोणासारखा आहे. उत्तरेकडे रुंद बाजू आहे व दक्षिणेकडे चिंचोळें टोंक गेलें आहे. उत्तरेस भूतान व बालीपारा सरहद्दीचा प्रांत असून पश्चिमेकडे पाकिस्तानी बंगाल आहे. पूर्व दिशेस ब्रह्मदेशाची सरहद्द लागली आहे. दक्षिण टोंकास लुशाई पर्वत आहे. त्या भागास ब्रह्मदेशाचा आराकान प्रांत चिकटला आहे. सुमारें हजार वर्षांपूर्वीं या आराकान प्रांताचा राजा **असम** ऊर्फ **अहम** यानें प्राग्ज्योतिष राज्यावर स्वारी केली व तें जिंकून तेथें आपल्या लोकांसह वस्ती केली. हे लोक नव्या प्रदेशांतील लोकांशीं पूर्णपणें मिसळून गेले. त्यांचेंच नांव पुढें जित प्रदेशास दिलें गेलें. त्यामुळें या प्रदेशाचें नवें व खरें नांव **असम** हें आहे. लोकांना **असमिया** म्हणतात. आपल्या प्रांतास आसाम म्हटलेलें त्या लोकांना खपत नाहीं. कोणी कोणी त्या प्रांताला कामरूप म्हणतात त्याचाहि त्यांना राग येतो. कारण कामरूप हा असममधील एक जिल्हा आहे.

# रमणीय असम

महाराष्ट्राला खानदेश किंवा सोलापूर या नांवानें उल्लेखिलें तर महाराष्ट्रीयांना कसें वाटेल ?

या प्रदेशाच्या हद्दीवर पूर्वी मणिपूर व त्रिपुरा अशीं दोन संस्थानें होतीं. स्वतंत्र भारताच्या घटनेप्रमाणें तीं आतां असम राज्याचाच एक भाग बनलीं आहेत.

असम प्रदेशांत एकूण बारा जिल्हे आहेतः—(१) लक्ष्मीपूर (२) शिवसागर (३) नौगाँग (४) दोराँग (५) कामरूप (६) गोलपारा (७) गारोपहाड (८) नागापहाड (९) काचार (१०) लुशाईपहाड (११) मणिपूर (१२) खाशीयापहाड.

जेवढ्या जिल्ह्यांच्या नांवांशीं 'पहाड' हा शब्द जोडला गेला आहे, त्या जिल्ह्यांत पहाडी टोळ्यांची वस्ती आहे. त्यांची भाषा, वेष, रीतिरिवाज व धर्मसमजुती असमिया लोकांच्याहून भिन्न आहेत. कांहींना हिंदु धर्माचे संस्कार मिळाले आहेत, कांहीं खिस्ती झाले आहेत तर कांहीं आदिमानवकालीन देवता व शक्ति यांवर विश्वास ठेवणारे आहेत.

हे पहाडी जिल्हे सोडल्यास मग इतर जिल्ह्यांतून डोंगर-पर्वत दिसत नाहींत. भारतांतील सर्वांत मोठ्या दोन नद्यांपैकीं एक जी ब्रह्मपुत्रा ती या प्रदेशांतून वाहते. परंतु लोक तिला फार घाबरतात. कारण तिचें पात्र अतिशय विश्वासघातकी आहे ! तिची दिशा एकमार्गी नाहीं. पात्र वारंवार बदलतें. महापूर येतात, सुपीक जमिनीचीं वाळवंटें बनतात आणि जमिनीची धूप वाहून जाते. त्यामुळें महाराष्ट्रांत ज्याप्रमाणें 'पावसाचें पाणी अडविण्याच्या योजना हातीं घ्या' अशी ओरड ऐकूं येते त्याप्रमाणें असममध्यें 'ब्रह्मपुत्रेला बांध घाला' हीच मागणी सर्वत्र केली जाते.

या ब्रह्मपुत्रेशिवाय आणखीहि पुष्कळ नद्या असममध्यें आहेत. दर चार-पांच मैलांवर एखादी लहान किंवा मोठी नदी दिसतेच. तिकडे 'डि' हें अक्षर 'पाणी' या शब्दाचें अन्वर्थक आहे. त्यामुळें पुष्कळ नद्यांचीं नांवें डिहिङ्, डिसाङ्, डिखोह अशीं आढळतात. डिसाङ् नदीच्या किनारीं असलेल्या डिसाङ्पाणि या गांवीं आमचा मुक्काम झाला होता. त्या प्रदेशांत दगड कमीच आहेत. डोंगरांतून दगड आणले जातात. जमीन केवळ मातीची आहे. असमिया भाषेंत जमिनीला 'माठी' म्हणतात. मराठींत माती शब्द आहे व त्याचा संबंध जमिनीशीं पोंचतो हें ऐकून ते लोक खूष झाले. मराठी व असमिया या दोन्ही भाषांत सारखे शब्द बरेच सांपडले. तेव्हां "मराठी भाषेशीं आमच्या भाषेचें खूप साम्य आहे" असें ते लोक डौलानें सांगूं लागले. वास्तविक पाहतां असमिया, बंगाली व उडिया या तिन्ही भाषा अत्यंत नजीकच्या आहेत. त्या तिन्ही भाषांतील शब्द, वाक्यरचना व उच्चार यांत खूप साम्य आहे. परंतु बंगाली भाषा अतिशय सामर्थ्यशाली, प्रभावी व साहित्यांतहि श्रेष्ठ ठरल्यामुळें तिचें आक्रमण आपल्यावर होईल अशी भीति या दोन्ही शेजाऱ्यांना वाटूं लागली. आणि म्हणून जर कोणीं त्यांस म्हटलें कीं, "बंगाली भाषेंत व असमिया भाषेंत फारच थोडा फरक आहे," तर ते क्षुब्ध होऊन एकदम त्याचा इन्कार करूं लागतात : "छे, छे, बंगालीशीं आमच्या भाषेचा मुळींच संबंध नाहीं. आमची भाषा अगदीं स्वतंत्र आहे !" शेजारीण जी बंगाली तिच्याशीं इतका सवता सुभा चालत असतांना दूरच्या मराठीशीं बादरायणी संबंध जोडण्याचें जें विलक्षण भरतें त्यांनीं दाखविलें त्यानें मात्र माझी थोडी करमणूक झाली. मराठी दूर असल्यामुळें तिचें आक्रमण असमियावर होईल ही भीति मुळींच नाहीं, हें बहुधा त्या उमाळ्याचें कारण असावें.

साऱ्या भारतवर्षांत जास्तींत जास्त पाऊस असममधील चेरापुंजी या स्थळीं पडतो. तेथें घनदाट जंगलें आहेत. आपल्या मान्सून पावसाचा संबंध असमशीं पोंचत नाहीं. तेथें हिमालयाच्या ईशान्य कोपऱ्यांतून पावसाचे ढग येतात. सामान्यतः ते एप्रिल म्हणजे वैशाख महिन्यांत येतात. पाऊस पडतो, थांबतो, पुन्हां येतो. असममध्यें भूकंप झाल्यापासून मात्र पावसाचा काळ व प्रमाण हीं बदललीं आहेत. यंदां पाऊस मार्चमध्यें म्हणजे चैत्रांत आला व तोहि आपल्याकडील आषाढ मासांत येतो तसा ! पावसाळा नसला








तरी पाऊस केव्हां तरी मधूनमधून डोकावतोच. तेथील हवा अतिशय सर्द आहे आणि जमिनींत बहुधा ओल असते. त्यामुळें तेथील मुख्य पीक भात हेंच आहे. कांहीं कडधान्यें वगैरे होतात. गहूं बाहेरून थोडा येतो. पण तो फक्त शहरांत दिसतो. बाजरी, ज्वारीचें नांवहि त्यांना माहीत नाहीं. पाणी असूनहि भाज्यांचा सुकाळ दिसला नाहीं. लोकांचें मुख्य अन्न म्हणजे भात व मासे हेंच आहे. असममधील दहा लाख एकर जमीन चहाच्या मळ्यांनीं व्यापिली आहे. चहाच्या मळ्यांचे मालक बहुतेक युरोपियन आहेत. शिवसागर व डिब्रूगढ या जिल्ह्यांत मुख्यत्वेंकरून चहाचे मळे आहेत. तेथें फिरत असतांना बहुधा चार-पांच मैलांच्या परिसरांत चहाचा एखादा कारखाना नजरेस पडत असेच.

असमची लोकसंख्या ८७ लक्ष आहे. इतर प्रांतांतील लोक तेथें फारसे दिसत नाहींत. तेथें वस्ती करून राहिलेले किंवा नोकऱ्या करणारे इतरप्रांतीय म्हणजे बंगालीच लोक विशेषेंकरून दिसतात. दक्षिणेकडील लोक चुकून दिसत नाहींत. क्वचित् नेपाळी, बिहारी व उत्तरप्रदेशचे लोक दिसतात. चहाच्या मळ्यांतून खपणाऱ्या मजूर स्त्रिया मात्र असमबाहेरच्याच दिसल्या. त्यांच्यापैकीं कांहीं महाकोशलकडून आल्या होत्या असें कळलें.

या प्रदेशाचा मागील इतिहास पाहातां ते लोक शूर व स्वातंत्र्यप्रिय होते असें दिसतें. भारतवर्षांत पुष्कळ साम्राज्यें होऊन गेलीं, पण असमप्रदेश कोठल्याहि साम्राज्यांत सामील झाला नव्हता. त्याच्या वाटेस कोणी जात नसे. कोणी गेले तर तो त्यांना आपल्या तरवारीचें पाणी चाखवी. इ. स. १८३६ पर्यंत त्यानें आपलें स्वातंत्र्य अबाधित राखलें. इ. स. १७७९ पासून १८३६ पर्यंतच्या काळांत ब्रह्मदेशानें असमवर दोनदां आक्रमण केलें. या लढायांत असमचे शूर योद्धे फार मोठ्या संख्येनें कामास आले व प्रदेश उध्वस्त झाला. शेवटीं शेवटीं एक बालराजा गादीवर आला. तो लहान असल्यामुळें सरदारांचें एक मंत्रिमंडळ राज्य चालवूं लागलें. या मंत्र्यांच्या आमदानींत प्रजा पिळून निघाली. जवळजवळ 'बळी तो कान पिळी' हा प्रकार चालू होता. मागील लढायांमुळें व कर्तृत्ववान् राजशक्तीच्या अभावीं राज्याची शक्ति निस्तेज होत गेली. बालराजा वयांत आला तरी तो दुर्बलच निघाला. शेवटीं १८३६ मध्यें इंग्रजांनीं ब्रह्मदेशावर चढाई करून त्याच्यावर जबरदस्तीनें कांहीं अप्रिय अटी लादल्या. त्यांत असम प्रदेश इंग्रजांच्या अंमलाखालीं आल्याचें कबूल करावें अशी एक अट होती. त्या तहावर सही झाल्यावर इंग्रजांचें सैन्य असम प्रदेशांत घुसलें व तत्कालीन राजास पदच्युत करून त्यांनीं सर्व प्रदेश ब्रिटिश साम्राज्यांत दाखल करून घेतला ! तेव्हांपासून असम प्रदेश राज्यकारभाराच्या दृष्टीनेंहि भारताचें एक अंग बनला.

असम प्रदेश तिबेट व ब्रह्मदेश यांच्या दरम्यान असल्यामुळें तेथील लोकांत मोंगलवंशाचे लोक पुष्कळ सांपडतात. पिवळट गौरवर्ण, चपटीं नाकें, तिरप्या भुंवया व डोळे, भुवयांना व पापण्यांना फार थोडे केस (पुष्कळदां पापण्यांऐवजीं मांसाचे जाड पडदेच बुबुळांच्या वरखालीं चिकटलेले वाटतात), बुटका कद, पिळदार बाहू व पोटऱ्या, पायांची कमी उंची आणि आडवा बांधा, अशा आकृती वारंवार दृष्टीस पडतात. डिसाङ्गपाणी या गांवांत तर चिनी वाटणारे स्त्री-पुरुष बहुसंख्येनें दृष्टीस पडले. तेथ एक बुद्धमंदिरहि होतें. बौद्ध लोकांची वस्ती ५०० होती असें कळलें. मात्र ते सारे हिंदी लोक होते. तथापि, असममध्यें बुद्धाचीं मंदिरें व बौद्धधर्मीय मधून मधून आढळतात. त्या धर्माचा तिकडील हिंदु लोकांवर व त्यांच्या धर्मविषयक समजुतीवर इतका परिणाम झाला आहे कीं, असममध्यें मूर्तिपूजा नाहीं. बाराव्या शतकांत श्री शंकरदेव नांवाचा एक मोठा साधुपुरुष त्यांच्यांत जन्मास आला. त्याच्या विचारांचा व शिकवणुकीचा प्रभाव त्या प्रांतांतील लोकांवर आजतागायत दिसून येतो. शंकरदेवानें मूर्तिपूजा निषिद्ध ठरविली व नामघरांचा प्रचार केला. असममध्यें देवळें नाहींत. नामघरें आहेत. लोकांना नामसंकीर्तन प्रिय असतें. मंदिरांत गोळा होऊन ते हरिकीर्तन करतात. शंकरदेवाचीं काव्यें व भजनें लोकप्रिय आहेत व शीख








लोक ग्रंथसाहेबाना पूज्य मानून गुरुद्वारांत ज्याप्रमाणें ग्रंथसाहेबांची प्रतिष्ठापना करतात त्याप्रमाणें असमिया लोक शंकरदेवांच्या ग्रंथालाच पूज्य मानतात. शंकरदेवांच्या मागून माधवदेव, दामोदर देव वगैरे संत होऊन गेले. माधवदेवांचेंहि वाङ्मय आहे. तें देखील लोकमान्य आहे. शंकरदेव जन्मास येण्यापूर्वी थोडीं वर्षें असममध्यें ग्रामसंस्था व ग्रामराज्यें सुरू झालीं होतीं. शंकरदेवांनीं त्यांची संघटना मजबूत केली. त्यांनीं मूर्तिपूजा व पशुबलि या प्रथा बंद करविल्या. आजहि देवदेवतांचीं मंदिरें जीं थोडीं असममध्यें दिसतात तेथें जाणारे लोक विशेषेंकरून बंगालीच असतात. आणि बहुधा कोंबड्या-बकऱ्यांचें बलिदान त्या मंदिरांतून होतच असतें. " या बंगाली लोकांकडून आमचे कांहीं लोक मूर्तिपूजा शिकूं लागले आहेत " असे नाराजीचे उद्‌गार मधून मधून मला असमिया लोकांच्या तोंडून ऐकूं आले. श्री. शंकररावांसाठीं कच्च्या व उकडलेल्या भाज्या तयार करतांना मला पाहून, सोबत असलेली एक सुशिक्षित असमिया भगिनी मला सांगूं लागली, " आमची मूळ पद्धतिहि हीच आहे. आमच्यांत मसाला नसतो. आम्ही उकडूनच भाज्या खातों. पण ( नाक मुरडून ) हल्लीं आमची कांहीं मंडळी बंगाली लोकांचे थेर शिकूं लागली आहेत आणि मसाला वापरूं लागली आहेत. " असममध्यें जें कांहीं वाईट येतें तें सारें बंगालमधून, असाच कांहींसा त्यांचा ग्रह दिसला.

असमच्या ग्रामीण प्रदेशांत गुरें इतस्ततः हिंडतांना दिसतात. परंतु इतकीं बुटकीं जनावरें कोठेंच नसतील ! त्यांचे पाय विलक्षण तोकडे असतात ! तेथील गाई-बैल व इकडील वासरें यांच्या आकारांत फारसा फरक नाहीं. एखादी गाभण गाय रस्त्यानें जात असली तर तिचें पोट जमिनीस टेकल्यासारखें दिसतें व एखादें वासरूं गाईस लुचतांना दिसलें तर वासराला वासरूं लुचतें आहे असेंच वाटतें व तो देखावा हिडिस वाटतो ! बकऱ्या रस्त्यानें चालतांना बघवत नाहींत. त्यांचे पाय गुडघ्याखालीं तोडल्यासारखे वाटतात !

चहाच्या मळ्याचा देखावा सुंदर दिसतो. तेथें नागलिंग किंवा नागेश्वर नांवाचा वृक्ष प्रसिद्ध आहे. त्याचीं फुलें सुंदर असतात असें ऐकलें, पण आमच्या प्रवाससमयीं त्या फुलांचा ऋतु नव्हता. आकाशांत छत्रीप्रमाणें आपला शिरोभाग मिरविणारे उंच नाहर वृक्षहि पाहिले. ते इतके भव्य व सुंदर दिसत होते, त्यांचा विस्तार इतका डौलदार व बांधेसूद होता कीं, त्याचें बीं मागण्याचा मोह एरवीं विरक्त वृत्तीच्या शंकररावांनाहि झाला !

माझ्याप्रमाणेंच शंकररावहि असममध्यें प्रथमच गेले होते. तेथील कार्यकर्त्यांशीं त्यांचा परिचय फारसा नव्हता. त्या भागांत गेल्यावर देशाच्या इतर भागापासून तोडून टाकल्यासारखें त्यांना वाटलें. टपालहि वेळेवर मिळत नसे. यांत टपालखात्याचा दोष नव्हता तर कार्यकर्त्यांमध्यें कार्यक्षमतेचा अभाव दिसून येत होता. कार्यकर्ते थोडे. त्यांच्यांत हिशेबीपणा किंवा समयसूचकता कमी. ते शारीरिक श्रम पुष्कळ करीत, पण त्यांची बुद्धिशक्ति सामान्य होती असा अनुभव आला. विधायक कामांत कुशल असलेले बहुतेक कार्यकर्ते राज्यकारभाराच्या तंत्रांत गुंतलेले होते, त्यामुळें या नव्या अथवा खालच्या दर्जाच्या कार्यकर्त्यांना नव्यानें संघटना-पद्धतीचे धडे देणें शंकररावांना भाग पडलें. त्यांचें सौजन्य व सेवाशक्ति मात्र अपार होती.

दौरा एकूण चार जिल्ह्यांतून ठरविला गेला होता. ते म्हणजे लक्ष्मीपूर, शिवसागर, नौगाँग व कामरूप. प्रत्येक जिल्ह्यांत कांहीं सब्‌डिव्हिजन्स असतात. असम काँग्रेसनें या सब्‌डिव्हिजनलाच जिल्हा लेखिलें आहे. त्या हिशेबानें शंकररावांचा दौरा डिब्रूगढ, शिवसागर, जोरहाट, गोलघाट, नौगाँग व गुवाहाटी या पोटजिल्ह्यांतून झाला. गुवाहाटी या शब्दाला इंग्रजांनीं ' गोहट्टी ' हें नांव दिलें. हें एक लाख वस्तीचें शहर असून असमचें सांस्कृतिक व शैक्षणिक केंद्र आहे. तें ब्रह्मपुत्रा नदीच्या किनाऱ्यावर वसलें आहे. जरी असमची राजधानी शिलाँग आहे तरी समाजजीवनांतील गुवाहाटीचें स्थान पाहातां तीच लोकांची राजधानी आहे असें म्हणतां येईल.

१५ मार्च रोजीं शंकररावांचा असममधील पहिला मुक्काम डिब्रूगढ सब्‌डिव्हिजनमधील










तिनसुकिया या गांवीं झाला. त्यानंतर २७ मार्चपर्यंत मी त्यांच्याबरोबर होतें. २८ तारखेस मी परत फिरलें. त्यांचा दौरा १७ एप्रिलपर्यंत चालणार होता. मला तोंपर्यंत त्यांचेबरोबर राहणें शक्य नव्हतें.

रोज १२ ते १६ मैलांचा पायीं प्रवास करावा लागे. शंकरराव ताशीं चार मैलांच्या वेगानें चालत. सोबत्यांची त्रेधा उडे. पण बहुधा थोड्या अंतरावर राहून का होईना, ते सोबत करीत. " शंकररावांनीं इतक्या घाईनें चालण्याचें कारण काय ? " असें एखादेवेळीं ते मला हळूच विचारीत.

शहरांतून हिंदी भाषा समजत असे. खेड्यांतून दुभाष्याची जरूर लागे. तिकडील खेड्यांतूनहि चौकस वृत्तीचे व व्यवहारकुशल श्रोते आणि पृच्छक दिसून आले ! स्त्रिया मात्र सभांतून क्वचित् दिसत असत.

कार्यकर्त्यांनीं पूर्वतयारी जरूर तेवढी केली नव्हती म्हणून म्हणा अगर लोकांत जिज्ञासाच कमी असेल म्हणून म्हणा, यात्रेबाबत लोकांत कुतूहल व उत्साह निर्माण झाल्याचें दिसून आलें नाहीं. पहिला मुक्काम तिनसुकिया येथें सुमारें ५०० लोक जमले होते. त्यानंतर माझ्या उपस्थितींत तरी एवढा श्रोतृगण कोठेंच दिसला नाहीं ! जिल्ह्याच्या मुख्य शहरांतून तर खेड्यांपेक्षांहि कमी श्रोतृगण दिसून येई. जमीनमालक-विशेषतः मोठे–मुद्दाम गैरहजर राहत किंवा त्याच दिवशीं बाहेरगांवीं जात असत असें ऐकलें. शंकरराव कधीं कधीं विनोदानें सभेंत बोलत, " मालक जमीन सोडून पळाले आहेत. त्यांनीं आपली जमीन गांवाच्या स्वाधीन केली आहे ! "

शिवसागर गांवाच्या आसपास चार मोठे तलाव आहेत : शिवसागर, रुद्रसागर, जयसागर व लक्ष्मीसागर. शंकररावांसह मीं दोन तलाव पाहिले– शिवसागर व जयसागर. परंतु त्यांचें दर्शन घेण्यापूर्वींच शंकररावांनीं आपल्या व्याख्यानांत त्या तलावांच्या नांवाचा उल्लेख करून एक नवी कल्पना श्रोत्यांसमोर मांडली: " कालाचीं दोन रूपें असतात. एक रुद्रस्वरूप असतें. दुसरें शिवस्वरूप असतें. कालाची मागणी आपण तावडतोब व खुशीनें पुरी केली तर तो शिवस्वरूप होतो. जर ती पुरी केली नाहीं तर तो रुद्रस्वरूप बनतो. "

लोकांनीं प्रश्न विचारण्यास सुरुवात केली म्हणजे शंकररावांना स्फुरण चढत असे व पुष्कळदां आपल्या समर्पक व विनोदी उत्तरांनीं लोकांना ते हंसवीतहि. एका गृहस्थानें प्रश्न विचारला : " बलिराजानें दान दिलें, त्यामुळें त्याचा निर्वंश झाला. आमचेंहि तसेंच झालें तर ?"

शंकररावांनीं उत्तर दिलें. " आम्हीं स्वतंत्र झाल्यावर दिल्लीलाच राजधानी बनविलें तेव्हां लोक म्हणूं लागले ' दिल्ली करंटी आहे ! ज्यांनीं ज्यांनीं दिल्लीचें राज्य केलें त्यांचीं राज्यें व साम्राज्यें बुडालीं. या स्वातंत्र्याच्या कालांत तरी राजधानीचें स्थळ बदला ' आम्हीं उत्तर दिलें : ' पूर्वीं दिल्ली राजांची राजधानी होती म्हणून राज्यें बुडालीं. आतां ती जनतेची राजधानी आहे. जनतेचा नाश कसा होईल ? राजे मेले तरी जनता कायम असते; तिचा निर्वंशहि होणें शक्य नाहीं. भारताची लोकसंख्या वाढत आहे, अशी ओरड आहे. ती कमी होत नाहीं, उलट संततिनियमनाचा प्रश्न सरकार व कित्येक लोक यांच्यासमोर येऊन पडला आहे." या उत्तरामुळें खूप हंशा पिकला !

मधून मधून लोक शंकररावांना मानपत्र देऊं इच्छीत. शंकररावांचा त्यामुळें विरस होई. ते म्हणत, " आम्हांस एकाग्र झालें पाहिजे. यज्ञकालांत जमिनीशिवाय कांहींहि घेतां कामा नये. इतर कशाचेंहि स्मरण, श्रवण वा कीर्तन करतां कामा नये. एकाग्र झाल्याशिवाय सिद्धि कशी मिळेल ? म्हणून माला, स्वागत, मानपत्रें यांची मजवर खैरात होऊं नये. एके काळीं यांतहि आनंद होता. आज तो नाहीं. हीं खेळणीं आहेत. आज आपण १८ बिघे जमीन दिलीत, त्याऐवजीं ८०० बिघे, निदान १८० किंवा ८१ बिघे जरी जमीन आपण दिली असती तर मला फार आनंद झाला असता. रात्रीं मला हिशोब द्यावा लागतो. दरिद्रनारायण मला विचारील तेव्हां त्याला काय

[ पान ३९ वर चालू








प्रा. गं. बा. सरदार

# आद्य महाराष्ट्रीय समाजसेविका : सावित्रीबाई फुले

अखिलभारतीय महिला-परिषदेचें पंचविसावें अधिवेशन यंदां ता. २ मे रोजीं पुणें येथें भरणार आहे. या रौप्यमहोत्सवाच्या निमित्तानें महाराष्ट्रांतील महिला चळवळीचा बहुधा आढावा घेतला जाईलच. गेल्या पंचवीस वर्षांत या चळवळीचा व्याप खूपच वाढला आहे. अनेक लहान-मोठ्या संस्थांच्या वतीनें गांवोगांवीं स्त्रियांच्या जागृतीचें व संघटनेचें कार्य चालूं आहे. निरनिराळ्या विद्यापीठांतून हजारों विद्यार्थिनी प्रतिवर्षी पदवीधर होऊन बाहेर पडत आहेत आणि त्यांतील कांहींजणी तरी सामाजिक जीवनाच्या हरएक प्रांतांत हिरीरीनें प्रवेश करून आपली कार्यक्षमता सिद्ध करीत आहेत. पांढरपेशा वर्गांतील सुशिक्षित स्त्रियांप्रमाणेंच मागसलेल्या थरांतील अशिक्षित स्त्रियांनाहि आपल्या हक्कांची व सामर्थ्याची जाणीव दिवसेंदिवस होऊं लागली आहे. या स्पृहणीय व आशादायक स्थित्यंतराचें श्रेय लोकहितवादी, फुले, रानडे, आगरकर, कर्वे, गांधी यांसारख्या महाभागांना तर आहेच; परंतु या नेत्यांच्या हांकेला तत्परतेनें ' ओ ' देऊन त्यांच्या चळवळींत आपापल्यापरीनें प्रत्यक्ष भाग घेणाऱ्या इतर व्यक्तीहि या श्रेयाच्या खचित वांटेकरी आहेत. अशा दुय्यम पण निष्ठावंत कार्यकर्त्यांच्या मालिकेंत सावित्रीबाई फुले यांची गणना होते.

सावित्रीबाई या सुप्रसिद्ध समाजसुधारक जोतीराव फुले यांच्या पत्नी होत. शंभर वर्षांपूर्वी स्त्री-जीवनाची ठराविक चाकोरी सोडून त्यांनीं आपल्या पतीबरोबर स्त्री-शिक्षणाच्या कार्यांत निर्भयतेनें व निःस्वार्थ बुद्धीनें पुढाकार घेतला आणि केवळ छायात्मक जीवन कंठणाऱ्या असंख्य स्त्रियांना आत्मोद्धाराचा व समाजसेवेचा धडा घालून दिला. घराच्या चार भिंतींत स्वतःला कोंडून न घेतां सार्वजनिक कार्याची जबाबदारी ( अगदीं अल्प प्रमाणांत का होईना ) पत्करणारी अर्वाचीन काळांतील पहिली महाराष्ट्रीय महिला म्हणून सावित्रीबाईंच्या नांवाचा नेहमींच गौरवपूर्वक उल्लेख करावा लागेल.

स्त्री-शिक्षणाच्या कार्याला महाराष्ट्रांत खिस्ती धर्मोपदेशकांनीं प्रथम चालना दिली. इ. स. १८३०–३३ च्या सुमारास त्यांनीं मुंबई, पुणें, नगर, नाशिक इत्यादि ठिकाणीं मुलींच्या स्वतंत्र शाळा काढल्या. विल्सन, स्टिव्हेन्सन, निज्बिट, फारार, मिचेलप्रभृति धर्मोपदेशकांच्या स्त्रिया त्यांच्याबरोबर येथें आल्या होत्या. त्यांनीं घरोघर हिंडून या शाळा यशस्वी करण्याची अतोनात खटपट केली. परंतु धर्मांतराच्या भीतीनें उच्चवर्णीय लोक त्यांच्या शाळेंत आपल्या मुली पाठविण्यास धजत नव्हते. त्यामुळें ह्या शाळांचा फायदा घेणाऱ्या विद्यार्थिनी बहुतेक मागसलेल्या जातींतील व गरीब कुटुंबांतीलच असत. मात्र इंग्रजी विद्येच्या संस्कारामुळें वरिष्ठ वर्गांतील सुशिक्षितांना स्त्री-शिक्षणाचें महत्त्व पटूं लागलें होतें. बाळशास्त्री जांभेकर, हरी केशवजी, दादोबा पांडुरंग, गंगाधरशास्त्री फडके इत्यादि मान्यवर लेखकांनीं स्त्रियांना शिक्षण देणें शास्त्रसंमत आहे असें प्रतिपादिण्यास सुरुवात केली होती. लोकहितवादींच्या ' शतपत्रां 'त तर समानतेच्या व मूलभूत हक्कांच्या भूमिकेवरूनच या प्रश्नाची मांडणी केली होती. त्यामुळें मुंबई-पुण्यासारख्या मोठ्या शहरांत हिंदी लोकांनीं चालविलेल्या स्वतंत्र कन्याशाळांची उणीव भासूं लागली व एल्फिन्स्टन विद्यालयांतील विद्यार्थ्यांनीं ती लवकरच भरून काढली. इ. स. १८४९ त मुंबईस ' स्टूडंट्स लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी ' च्या ८ शाळा निघाल्या. त्यांपैकीं ४ मराठी भाषिकांसाठीं व ४ गुजराती भाषिकांसाठीं होत्या. अशा सुधारणेस मुंबईचें वातावरण बरेंच अनुकूल होतें. शिवाय या कार्याला पहिल्यापासून पारशी समाजाचा भरपूर पाठिंबा



अनुक्रमणिका






मिळाला होता. त्यामुळें ह्या कन्याशाळांच्या चालकांना सनातन्यांचा विरोध विशेष जाणवला नाहीं.

पुण्यांतील परिस्थिति मात्र अगदीं निराळी होती. पुराणमतवाद्यांचें वर्चस्व अद्याप कायम असल्यामुळें, कोणत्याहि नव्या उपक्रमाला येथें कसून विरोध होण्याचा संभव होता. तेव्हां पुण्यांत मुलींच्या शाळा काढून त्या नीट चालवून दाखविणें हें काम सहजासहजीं साधण्याजोगें नव्हतें. त्यासाठीं कल्पकता, पांडित्य, वादनैपुण्य या गुणांपेक्षां धैर्य, त्याग, सहिष्णुता, उद्योगशीलता, आत्मविश्वास, संग्राहक वृत्ति इत्यादि नैतिक गुणांची अधिक आवश्यकता होती. जोतीरावांच्या अंतः-करणांत दलितोद्धाराची तळमळ होती, त्याबरोबरच ध्येयसिद्धीसाठीं लोकनिंदेचे आघात शांतपणें सोसण्याचीहि त्यांच्या मनाची तयारी होती. म्हणूनच अत्यंत निरुत्साहजनक परिस्थितींतहि त्यांनीं पुण्यांत मुलींच्या शाळा स्थापण्याचा निश्चय केला व सावित्रीबाईच्या व इतर इष्टमित्रांच्या साह्यानें तो पार पाडला.

इ. स. १८५१-५२ या वर्षांत जोतीरावांनीं बुधवार पेठेंत एक, रास्ता पेठेंत एक आणि वेताळ पेठेंत एक अशा एकामागून एक तीन शाळा उघडल्या. लोकांचा विश्वास संपादन केल्या शिवाय ह्या शाळा ऊर्जितावस्थेस येणार नाहींत म्हणून कृष्णशास्त्री चिपळूणकर, विष्णुशास्त्री पंडित, अण्णा सहस्रबुद्धे यांच्यासारख्या प्रतिष्ठित नागरिकांची एक समिति नेमून तिच्याकडे त्यांनीं ह्या शाळांची व्यवस्था सोंपविली. परंतु एवढ्यानें आपल्या शाळांना स्थैर्य लाभेल अशी फुल्यांना खात्री वाटेना. अध्यापनासाठीं कांहीं शिक्षिका नेमतां आल्या, तर विद्यार्थिनींना तेवढा मोकळेपणा वाटेल व पालकहि निःसंकोचपणें शाळेंत मुली धाडतील, असें त्यांच्या मनानें घेतलें.पण त्या काळीं शिक्षिकेच्या कामासाठीं एखादी स्त्री पुढें येणें देखील दूरापास्त होतें. तेव्हां 'हलवायाच्या घरावर तुळशीपत्र' ठेवण्याची यातायात न करतां जोतीरावांनीं खुद्द आपल्या पत्नीलाच ही कामगिरी सांगितली. तीन वर्षें मेहनत घेऊन अगोदरच त्यांनीं सावित्रीबाईंना शिक्षण दिलें होतें. आतां त्यांच्या पतिप्रेमाची व प्रगमनशीलतेची कसोटी होती. पूर्वसंस्कारांचें दडपण त्यांनीं झुगारून दिलें व 'जग काय म्हणेल' याची पर्वा न करतां फुल्यांच्या म्हणण्यास त्यांनीं तावडतोब रुकार दिला. अध्यापनाचें काम तर त्यांनीं सुरू केलेंच, पण आपल्या बरोबरीच्या दुसऱ्या तीन स्त्रियांनाहि शिकवून त्यांनीं तयार केलें. बुधवार पेठेंतील एक नंबरच्या शाळेंत सावित्री-बाई मुख्य अध्यापिका होत्या आणि त्यांच्या हाताखालीं विष्णु मोरेश्वर व विठ्ठल भास्कर असे दोन शिक्षक होते. तिऱ्हाईत पुरुषाला परवानगीशिवाय शाळेच्या आवारांत प्रवेश करण्यास बंदी होती. मुलींना सुरक्षित नेण्याआणण्यास पट्टेवाले ठेवले होते. अशा कडेकोट बंदोबस्तांत शाळेचें काम चालू असल्यामुळें वर्षभरांत विद्यार्थिनींची संख्या दोनशेंहून अधिक झाली. शिक्षकांचा पगार अगदीं बेताचा असल्यामुळें ते मध्येंच शाळा सोडून जात. त्यामुळें अध्यापकवर्गांत वरचेवर बदल होई. जोतिराव व सावित्रीबाई मात्र विनावेतन काम करीत होते. सावित्रीबाईच्या सासऱ्यांना त्यांचें हें समाजकार्य रुचलें नाहीं व या मतभेदाचें अखेर भांडणांत पर्यवसान होऊन, फुले पति-पत्नींना आपलें राहतें घर सोडणें भाग पडलें. या प्रसंगीं त्यांनीं दाखविलेलें धैर्य व कार्यनिष्ठा हीं खरोखरींच अलौकिक व अविस्मरणीय आहेत. एखाद्या स्त्रीनें सार्वजनिक शाळेंत विनावेतन काम करण्यांत कांहीं विशेष कर्तृत्व आहे असें आज कोणी मानणार नाहीं. परंतु कोणत्याहि कृतीचें मोजमाप करतांना प्रथम त्या वेळची परिस्थिति ध्यानांत घेतली पाहिजे. एवढी लहानशी सुधारणा अंमलांत आणतांना, स्त्रीदास्यविमोचनाच्या चळवळींतील हें पहिलें पाऊल टाकतांनाहि, सावित्रीबाईंना जबर किंमत द्यावी लागली आहे. म्हणूनच सरकारी विद्याखात्याच्या तत्कालीन प्रतिवृत्तांत सावित्रीबाईच्या कार्याचा मुद्दाम निर्देश केला आहे तो असा :

"One young man, named Joti Govindrao Phuley, a gardener by caste, but of a certain independence








of fortune, deserves to be particularly noticed, and possibly the Board might think it well to honor him by the gift of a medal, or by some other distinction. This young man has not only formed a female school, which he teaches gratuitously for four hours a day, but he has also trained his wife by three years' careful tuition to assume the office of school mistress, and the latter has a normal class of three other young women, whose husbands, Brahman school-masters are equally enthusiastic in the cause."—Report of the Board of Education 1851-52. p. 12.

त्याचप्रमाणें कन्याशाळा समितीच्या चिटणिसांनीं ता. १७-२-१८५२ रोजीं सरकारकडे धाडलेल्या माहिती-पत्रकांतहि सावित्रीबाईच्या कार्याची पुढील शब्दांत प्रशंसा केली आहे :

" Savitreebaee, the school mistress, has nobly volunteered to devote herself to the improvement of female education without any remuneration. "

सावित्रीबाई या पुण्याजवळील कवठी गांवचे झगडे पाटील यांच्या कन्या होत. यापलीकडे त्यांच्या चरित्रांतील कांहीं विश्वसनीय व प्रमाणभूत माहिती उपलब्ध नाहीं. इ. स. १८९६ मध्यें पुण्यांतील पहिल्या प्लेगच्या साथींत त्या दिवंगत झाल्या.

---

## रमणीय असम [ पान ३६ वरून पुढें चालू ]

सांगावें ? मी म्हणेन ' आज हें मानपत्र मिळालें ' तर तो काय म्हणेल ? मानपत्र खाऊन माझी भूक शमेल का ? आज जेवतांना मला वाटलें कीं आज चांगलें भोजन मिळालें; पण ज्याच्या नांवावर भोजन मिळालें त्याच्यासाठीं मीं काय आणलें ?"

तरुण विद्यार्थ्यांना उद्देशून बोलण्याचा प्रसंग आला म्हणजे शंकररावांच्या वाणीस उत्साहाचें भरतें येई. शिवसागरला मुक्काम असतांना तेथील कॉलेजच्या विद्यार्थ्यांसमोर त्यांचें झालेलें व्याख्यान म्हणजे दीक्षाविधीचा एक उत्कृष्ट नमुना होता. विद्यार्थी व अध्यापकवर्ग सर्वांनाच तें आवडलें. परंतु असे प्रसंग क्वचित् येत. त्या वेळीं चहूंकडे वार्षिक परीक्षा चालू असल्यामुळें इच्छा असूनहि संस्था-चालकांना विद्यार्थ्यांचे कार्यक्रम करतां आले नाहींत.

ऊन, पाऊस, चिखल, अरण्यें कशाचीहि पर्वा न करतां शंकरराव यज्ञार्थ भ्रमण करीत होते. कित्येक कार्यकर्त्यांनीं मला विचारलें, " शंकररावांची प्रकृति फार खालावलेली दिसते. आम्हीं त्यांना मागें पाहिलें तेव्हां ते असे दिसत नव्हते. " मीं म्हटलें, " त्यांना यज्ञाची ज्वाला भाजून काढीत आहे ! हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकापि वा । "

---








श्री. के. वा. भोळे

# श्री. केसरबाई केरीकर

गतवर्षीप्रमाणें भारतसरकारनें यंदांहि चार नामांकित कलावंतांना बक्षिसें देऊन त्यांचा नुकताच सत्कार केला. त्यांत केसरबाई यांचा सत्कार महाराष्ट्राच्या व गोमंतकाच्या दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे. खरें म्हणजे गेल्या वर्षीच केसरबाईना हा मान मिळावयास हवा होता. असो.

केसरबाईनीं उभी हयात संगीतव्यासंगांत व संगीतशिक्षणांत घालविली. त्यांचें संगीतांतील प्राथमिक शिक्षण गोव्यांतच कै. वझेबुवांकडे झालें. ते त्यांचे आद्य गुरु होत. त्या काळामध्यें त्यांच्या कलेचा परामर्श मिरजेचे अधिपति दरवर्षीं गणेशोत्सवांत घेत असत. नंतर केसरबाई मुंबईत आल्या व त्यांनीं कै. भास्करराव बखले, म. अबदुल करीमखां, म. बरकत उल्लाखां (पखवाजिए, सतारिए) यांच्याकडे विद्या घेतली व शेवटीं म. अल्लादियाखां यांच्याकडे त्यांचें शिक्षण झालें. तें जवळजवळ खांसाहेबांच्या हयातीपर्यंत चालूं होतें. आज त्यांच्या गळ्यावर प्रामुख्यानें अल्लादियाखांच्या गायकीची छाप आहे. केसरबाईइतका विद्येचा ध्यास क्वचितच कोणी घेतला असेल. हें त्यांच्या गुरूंच्या संख्येवरूनच दिसून येईल. अल्लादियाखांसाहेबांनीं गंडा बांधण्यापूर्वीं त्यांना फारच मुष्किल अटी घातल्या होत्या. परंतु त्या सर्व तंतोतंत पाळून गुरूंची सेवा करून, त्यांची मर्जी प्रसन्न करूनच, त्यांनीं गायकी घेतली. मुसलमानांचा मेहनतीचा गुण केसरबाईत भरपूर असल्यानेंच या खडतर व्रताची सांगता त्यांना करतां आली. त्यांच्या या कलाप्रेमाचें फल त्यांना गुरूंकडून मिळालें.

केसरबाईंची कीर्ति १९२० पासून भारतांत पसरूं लागली. मोठमोठ्या संगीतशौकिन संस्थानिकांकडून त्यांना गायनाचीं निमंत्रणें येऊं लागलीं. १९३० सालीं मुंबई रेडिओवर त्यांचे कार्यक्रम नियमितपणें होऊं लागले. त्यामुळें तर त्यांचें नांव फारच मशहूर झालें. कलकत्ता, अलाहाबाद, बनारस, पतियाळा येथील संगीत परिषदांमधून त्यांचीं गाणीं होऊं लागलीं. १९३६ सालीं त्यांच्या मोठ्या रेकॉर्ड्स्, पुष्कळ पैसा खर्च करून, ब्रॉडकास्ट् कंपनीनें घेतल्या होत्या. नंतर अलीकडे १९४५ सालीं ग्रामोफोन कंपनीनें त्यांच्या कांहीं हातखंडा चिजांचें ध्वनिमुद्रण करून त्यांपैकीं आठ रेकॉर्ड्स् प्रसिद्ध केल्या आहेत. या सर्व चिजा प्रचलित व अनवट रागांतील आहेत. त्यांचें ध्वनिमुद्रण इतकें उत्तम झालें आहे कीं, रेडिओग्रॅमवर त्या वाजविल्या तर प्रत्यक्ष बाई गात आहेत असाच भास होतो!

संगीतांतील अनेक घराण्यांचे व ढंगांचे पाठ घेत असतांना त्यांनीं अत्यंत मेहनत करून गळा कमावला. तो कमावीत असतांना त्याचें नैसर्गिक स्वरूप त्यांनीं कायम ठेवलें व तिन्ही सप्तकांत तो सहजपणें सुरेल लागेल इकडे अवधान ठेवलें. यामुळें आलाप आणि तान घेतांना तो गळा आपल्या स्वरूपांत सहज सुरेल फिरतो. कोणतीहि विकृति अगर कोणताहि कृत्रिमपणा त्यांत त्यांनीं येऊं दिला नाहीं ही त्यांतील विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट आहे. म्हणून त्यांची निर्मळ आवाजांतील तान, आलाप, मुरकी, खटका श्रवणीय असतात. गाढ मेहनतीनें त्यांनीं आवाज इतका लवचिक केला आहे कीं, मन

मानेल, मनांत येईल ती मुष्किल तानहि त्या सहज विनाकष्ट घेऊं शकतात. हवेसारखी सहज दमदार फिरत या चिकाटीच्या मेहनतीवरच त्यांनीं साध्य केली आहे. मेहनतीनें गळ्याची निकोप तयारी किती विलक्षणपणें साध्य करतां येते, याचा आदर्श केसरबाई होत, हें आजच्या कलावंत होऊं इच्छिणाऱ्यांना आवर्जून सांगावेसें वाटतें. साऱ्या हयातींत त्यांनीं संगीताखेरीज कसलाच ध्यास घेतला नाहीं आणि त्याचें फळ त्यांना मिळालें आहे. आज पन्नाशीच्या पुढें वय गेलें असतांनाहि त्या तासन् तास विनाकष्ट मैफलींत गाऊं शकतात. गोवेकर—आवाजदार असो नसो—सर्वस्वीं कलेला वाहून घेऊन, त्यांत तन-मन-धन खर्च करतो हें केसरबाईप्रमाणेंच मोगूबाई, कै. ताराबाई यांच्या उदाहरणांवरून सिद्ध होतें. कलेकरितां सर्वस्वाचा त्याग करून तिच्या साधनेंत व सेवेंत आनंद मानणें हा गोव्याच्या मातीचा गुणच होय!

केसरबाईचा नुसता सत्कार करून 'संपलें' असें मानण्याचें भारत सरकारनें धोरण ठेवूं नये. भारताच्या महत्त्वाच्या प्रत्येक रेडिओकेंद्रावर त्यांच्या गायनाचे कार्यक्रम नियमितपणें करणें, त्यांचें टेपवर ध्वनिमुद्रण करून त्याचा शिक्षणाकरितां संग्रह करणें हेंहि सरकारचें एक आणखी कर्तव्य आहे. नाहीं तर अल्लादियाखांची ही विद्या नामशेष होण्याचा फार संभव आहे. आज या घराण्यांतील मोगूबाई, केसरबाई व श्री. मल्लिकार्जुन मन्सुर हे तीन प्रथम श्रेणीचे गायक आहेत व त्यांचे गळे फिरत आहेत, तोंवरच हें कार्य सरकारनें केलें पाहिजे. आणि अशा प्रथम श्रेणीच्या सर्वच कलावंतांचें ध्वनिमुद्रण सरकारनें केलें पाहिजे—मग तो गायक असो वा वादक असो—तरच नामशेष होऊं पाहाणाऱ्या या कलेचें रक्षण होईल. टेपवर एक तासाचें ध्वनिमुद्रण होऊं शकतें. या बाबीकडे मी सरकारचें लक्ष वेधूं इच्छितों. हें कार्य केलें तरच हा सत्कार सत्कारणीं झाला असें मानतां येईल. इतकें याचें शैक्षणिक महत्त्वहि आहे.

---

## संगीत-क्षेत्रांतील यंदाचे मानकरी

यंदा गेल्या १५ मार्च १९५३ ला चार उत्कृष्ट संगीत कलाकारांचा भारतीय सरकारतर्फे दिल्लीला सत्कार करण्यांत आला. त्यांपैकीं (१) **सूरश्री केसरबाई केरकर** यांची ओळख वर श्री. **केशवराव भोळे** यांनीं करून दिलीच आहे. गौरविलेले इतर जे तीन संगीत कलाकार त्यांचा परिचय '**संगीतकलाविहार**' (मिरज) या मासिकाच्या एप्रिल अंकांत आला आहे. त्यावरून त्यांच्याविषयीं पुढील माहिती संक्षिप्त करून संकलित केली आहे. (२) **उस्ताद हफीज अलीखां**: ह्यांचें सरोदवर असामान्य प्रभुत्व आहे. त्यांचे वडील व आजोबा हे दोघेहि सरोद फार उत्तम वाजवीत असत. हफीज अलीखां हे ग्वाल्हेर दरबारचे खास कलाकार होते. आज त्यांना त्या दरबारकडून पेन्शन मिळत आहे. (३) **प्रो. द्वारम् वेंकटस्वामी नायडू**: हे व्हायोलिनवादनपटु विजयनगरच्या म्यूझिक कॉलेजचे प्राचार्य आहेत. त्यांच्या कॉलेजमध्यें जन्मांध अशा पंचवीस विद्यार्थ्यांच्या एका तुकडीला व्हायोलिनवादनकलेंत ते तयार करीत आहेत. ते स्वतः अंधारांतच मेहनत करीत असतात. त्यामुळें त्यांच्या हातांतून पाहिजे तो हुकमी स्वर बाहेर पडतो. 'टच सिस्टिम'चा पुरस्कार प्रो. नायडूंनींच केला. जगप्रसिद्ध व्हायोलिन-वादन यहुदी मेनुहिन हिंदुस्थानांत आले असतांना प्रो. नायडू यांना भेटले. यांनीं त्यांना दरबारी कानडा वाजवून दाखविला. तो राग ऐकून मेनुहिन यांनीं प्रो. नायडू यांची फार प्रशंसा केली. (४) **प्रो. सेमनगुडी श्रीनिवास अय्यर**: यांचें दक्षिण हिंदुस्थानी संगीत-कलाकारांत महत्त्वाचें स्थान आहे. त्यागराजकालीन महाराजा स्वाथी तिरुनल यांच्या काव्याचें त्यांनीं संशोधन केलें आहे. ते स्वतः 'स्वाथी तिरुनल ॲकेडमी ऑफ म्यूझिक'चे प्राचार्य आहेत.








श्री. र. के. खाडिलकर

# सोव्हिएट नवसंस्कृतीनें केलेली विचारक्षेत्रांतील क्रांति

दुसऱ्या महायुद्धानंतर समाजवादी जगानें एकतृतीयांश भूप्रदेश व्यापला. ८० कोटी लोक त्या जगांत नांदूं लागले. लेनिनकडून आलेल्या क्रांतीचा वारसा, त्यांत मोठी भर टाकून, स्टॅलिननें समृद्ध केला. समाजवादी जगाच्या या भौतिक विस्तारानें जागतिक राजकारणांत केवढा पालट झाला हें सहज लक्षांत येतें; परंतु विचारक्षेत्रावर झालेल्या आघाताची कल्पना तेवढीशी येत नाहीं. यासाठीं जुन्या जगांतील लोकशाहीच्या कल्पना, अर्थ-व्यवस्था, किंबहुना तेथील सामाजिक जीवनाचा तात्त्विक आधार यांना नव्या जगाच्या उदयामुळें केवढा धक्का बसला आहे व त्यांत कोणता बदल झालेला आहे याचें थोडक्यांत दिग्दर्शन करणें जरूर वाटतें.

## पाश्चात्त्य लोकशाही विचारावर आघात

रशियांतील क्रांतींतून निर्माण झालेल्या समाजवादी जगानें पाश्चात्त्य लोकशाही कल्पनेला मोठा धक्का दिला. पहिल्या महायुद्धाच्या काळांत लोकशाहीवरील श्रद्धाच डळमळीत झालेली होती. त्याच वेळीं रशियांतील क्रांतीचा तिच्यावर आघात झाला. " ज्या लोकशाहीचा आपण पुरस्कार करतों तिचा अर्थ काय, याविषयीं आपण साशंक आहोंत. " असे उद्गार लोकशाहीचा एक थोर कैवारी मि. क्रॉसमन यानें काढलें आहेत (' Plato Today '). पहिल्या महायुद्धानंतर विजयी झालेल्या पाश्चात्त्य राष्ट्रांची मनःस्थिति या उद्गारांत चांगलीच व्यक्त झाली आहे. पहिल्या महायुद्धाच्या शेवटीं लोकशाहीचा मंत्र प्रेसिडेंट विल्सन यानें उच्चारला आणि दुसऱ्या महायुद्धांत तीच कामगिरी मार्शल स्टॅलिन याच्याकडे आली असें पाहावयास मिळतें. दोस्तांचे युद्धहेतु स्पष्ट करतांना लोकशाही स्वातंत्र्याचा उच्चार प्रथम त्यानेंच केला. प्रेसिडेंट रूझवेल्ट व चर्चिल यांनीं तयार केलेल्या प्रसिद्ध ' अटलांटिक सनदें 'त लोकशाहीचा नामोच्चार नाहीं, हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. युद्धकालांत मॉस्को, तेहरान, याल्टा, तसेंच पॉट्सडॅम या ठिकाणीं दोस्तनेत्यांच्या मसलतींत ज्या ज्या वेळीं युद्धोत्तर जगाचा विचार झाला त्या त्या वेळीं लोकशाहीच्या तत्त्वाचा आग्रहानें पुरस्कार करण्याचें श्रेय मार्शल स्टॅलिनकडे जातें, असें प्रो. कार यानें साधार प्रतिपादन केलें आहे.[1] पाश्चात्त्य राष्ट्रांतील प्रातिनिधिक उदारमतवादी लोकशाही जुन्या सरंजामी राजवटीपेक्षां निःसंशय प्रगतिपर आहे, तो एक पुढचा पल्ला आहे, ही गोष्ट रशियांतील क्रांतीचे नेते मान्य करीत असले तरी, त्यांची नव्या लोकशाहीची कल्पना ही अधिक व्यापक व विकसित आहे, असा कम्युनिस्टांचा दावा आहे. यासंबंधींचा विचार करतांना इंग्लंड व फ्रान्स या राष्ट्रांत राज्यक्रांतीनंतर पुढें आलेली लोकशाही-परंपरा भिन्न होती, हें विसरून चालणार नाहीं. विरोधी मताला म्हणजेच अल्पसंख्य मताला आपलें मत प्रदर्शित करण्याचा हक्क हा ब्रिटिश लोकशाहीचा गाभा आहे. या उलट फ्रेंच क्रांतींतून पुढें आलेल्या लोकशाही विचारांत व्यक्तीला समाजाशीं एकरूप कल्पिण्यांत आलें, तसेंच समाज आणि राज्यसत्ता हीं अभिन्न आहेत असें मानण्यांत आलें. त्यामुळें अल्पसंख्य विरोधी मत प्रकट करणें म्हणजे समाजद्रोह अशी समजूत रूढ झाली. रूसोच्या तत्त्वज्ञानानें तेथील लोकशाही विचाराला हें वळण लागलें. आधुनिक जगांतील अनियंत्रित लोकशाहीचें जनकत्व हें अशा रीतीनें रूसोकडे जातें. राज्यसत्तेच्या विशिष्ट मताशीं व्यक्तीला आपला विरोध दर्शविण्याचें स्वातंत्र्य, म्हणजेच राजकीय सहिष्णुता ही फ्रेंच परंपरेंत रुजली नाहीं. युरोपमध्यें जो लोकशाहीचा विचार पसरला तो फ्रेंचांच्या परंपरेंतून आलेला होता. ब्रिटिशांच्या

१. ' The Soviet Impact on the Western World ' by Prof E. H. Carr, p. 95








विचाराचा प्रभाव तेथें पडला नाहीं हें ध्यानांत घेणें अगत्याचें आहे.

१८४८ नंतर लोकशाही विचार हा पूर्वींप्रमाणें क्रांतिकारक राहिला नाहीं. कारण क्रांतींतून पुढें आलेल्या नव्या धनिकवर्गानें 'स्वातंत्र्य, समता व बंधुता' हीं क्रांतीचीं उद्दिष्टें स्वतःसाठीं राबविलीं आणि विसाव्या शतकाच्या सुरुवातीस समाजवादी विचाराच्या वाढीला पायबंद घालण्यासाठीं लोकशाहीचा तटबंदीसारखा वापर होऊं लागला. रशियाला या फ्रेंच परंपरेंतील विचाराचीच ओळख होती. क्रांतीच्या उद्दिष्टांना हरताळ फांसून नव्या भांडवलदारवर्गानें आपली बटीक बनविलेल्या या लोकशाहीचें, कामगारवर्गाच्या वाढत्या आकांक्षांना पायबंद घालणें, हेंच उद्दिष्ट बनलें. अशा रीतीनें अपुरें राहिलेलें क्रांतिकार्य पुरें करण्यासाठीं कामगारवर्गाच्या नव्या लोकशाहीची कल्पना रशियांत पुढें आली.

## सामान्य माणसाचें युग

रशियांत स्थापन होऊन वाढीला लागलेल्या कामगारसत्तेनें जुन्या जगांतील लोकशाही विचारांवर तसेंच संघटनेवर मोठा आघात केला. तिचा पाहिला हल्ला लोकशाहीच्या यंत्रणेवर व तिच्या वर्गीय स्वरूपावर आहे. जुन्या लोकशाहींत राज्यकारभार लोकांच्या मतानें चालविण्यांत येतो, हा दावा नव्या तत्त्वज्ञानाला मान्य नाहीं. कारण कोणत्याहि सरकारच्या उद्दिष्टांमध्यें सक्तीचा अतर्भाव झालेलाच असतो. जें आपखुषीनें केलें जात नाहीं तें करवून घेण्यासाठीं 'सरकार' ही संस्था समाजांत अस्तित्वांत आली. कोणाकरितां व कोणत्या उद्दिष्टांसाठीं ही सत्ता वापरली जाते यावरून तिचें अंतरंग स्पष्ट होतें. वर्गरहित समाज असेल तर सरकारच्या दंडशक्तीची कांहीं गरजच उरणार नाहीं. वर्गावर्गांच्या संघर्षांतून राज्यसंस्थेची निर्मिति झालेली आहे आणि म्हणून समाजांतील सर्वांत मोठा जो श्रमिकवर्ग त्याच्या हातीं राज्यसंस्था आली पाहिजे असा मार्क्सच्या या तत्त्वज्ञानाचा मथितार्थ आहे. "परस्परविरोधी हितसंबंध असलेल्या भांडवलदारी व्यवस्थेंत लोकशाहींतील सत्ता ही अंतिमतः त्या समाजांतील बलिष्ठ वर्गाच्या म्हणजेच धनिकवर्गाच्या हातांत जाते. या उलट सोव्हिएट संघराज्यांत श्रमिकांची लोकशाही म्हणजे खरीखुरी लोकसत्ता होय." या १९३६ सालीं रशियांतील नव्या घटनेसंबंधीं बोलतांना स्टॅलिननें काढलेल्या उद्गारांत, जुन्या व नव्या लोकशाहीच्या स्वरूपांतील मूलभूत भेद स्पष्ट झाला आहे. कोणत्या घटनात्मक मार्गानें लोकशाही आपलें उद्दिष्ट साध्य करते हा प्रश्न गौण ठरतो. इंग्लंड आणि फ्रान्समध्यें सरंजामी सत्तेचें जोखड झुगारून दिल्यावर उदयोन्मुख भांडवलदारवर्गाच्या हातीं सत्तेचीं सूत्रें येऊन त्याचा जम बसेपर्यंतच्या काळांत इंग्लंडमधील कॉम्वेल आणि फ्रान्समधील जॅकोबिन्स यांना आपली सर्वाधिकारशाही कांहीं काळ गाजवावीच लागली, हा इतिहासाचा दाखला ध्यानांत घेतल्यास रशियानें निर्माण केलेल्या कामगारवर्गीय हुकुमशाहीचा उलगडा होऊं शकेल. कारण धनिकांची सत्ता पूर्णतया नाहींशी करण्यासाठीं कामगारवर्गानें निर्माण केलेली हुकूमशाही हें एक शस्त्र किंवा साधन आहे. आणि भांडवलदारी संस्कृतीचे अवशेष समूळ नाहींसे झाल्यानंतर ही सर्वाधिकारशाही कालांतरानें विराम पावणार आहे. पाश्चात्त्य जगांत लोकशाही यंत्रणेला अवास्तव महत्त्व देण्यांत आलें आहे. आणि त्या यंत्रणेशीं विरोधी असा लोकशाही व्यवहार दिसताच त्यावर सर्वाधिकारशाहीचा शिक्का मारला जातो. रशियांतील लोकशाहीमध्यें आशयाला म्हणजे उद्दिष्टाला प्राधान्य दिलेलें आहे. उद्दिष्टापेक्षां बाह्य यंत्रणेचा बडेजाव माजविणाऱ्या पाश्चात्त्य लोकशाहीचें अंतरंग, रशियांत वाढीला लागलेल्या कामगारवर्गीय लोकशाहीनें उघडें केलें. यामुळें सामान्य माणसाच्या हितसंबंधाकडे अधिक लक्ष पुरविलें पाहिजे, याची नवी जाणीव भांडवलदारी समाजांत निर्माण झाली. आतां पाश्चात्त्य राष्ट्रांकडून 'सामान्य माणसाचें युग सुरू झालें' असा पुकारा करण्यांत येत आहे, तो रशियांतील लोकशाहीचाच प्रभाव नाहीं काय?

रशियानें स्वीकारलेल्या सिद्धान्तानुसार लोकशाहीचा पूर्ण विकास साम्यवादावांचून होऊंच शकत नाहीं. यासाठीं लोकशाहीच्या राजकीय








स्वरूपापेक्षां तिच्या सामाजिक उद्दिष्टांवर खरा कटाक्ष पाहिजे, हा नव्या विचारामागें आग्रह आहे. ' विद्यमान सामाजिक संबंधांच्या आंधळ्या व्यवहाराला पाश्चात्त्य लोकशाही धक्का लावीत नाहीं. त्या खोल अज्ञात भागावर रशियांतील क्रांतीनें पहिला तडाखा दिला ' या ट्रॉट्स्कीच्या उद्‌गारांत जुन्या कल्पनेवर नव्याचा जो आघात झाला त्याचें स्वरूप अधिक स्पष्ट होतें. नव्या लोकशाहीच्या वाढीनें पाश्चात्त्य लोकशाहींतील ही मोठी उणीव जगाच्या अधिक स्पष्टपणें निदर्शनास आणली आणि त्यायोगें डळमळीत झालेला पाश्चात्त्य लोकशाहीवरील विश्वास आणखी ढांसळला.

### सहिष्णुतेचा अन्वयार्थ

सहिष्णुतेचें तत्त्व हा जणूं जुन्या लोकशाहीचा प्राणच आहे असें मानण्यांत येतें. पण या तत्त्वाचा नव्या लोकशाहीनें वारंवार धिक्कार केला आहे. ज्या ठिकाणीं विरोधी मताला अवसर नाहीं, तेथें लोकशाही असूंच शकत नाहीं, म्हणून रशियांत लोकशाही नाहीं, असा आरोप पाश्चात्त्य लोकशाहीवाद्यांकडून केला जातो. वस्तुतः लोकशाहीलाच मारक अशा मतप्रणालीला वाव देणें हें तत्त्वनिष्ठेचें निदर्शक नाहीं किंवा त्याशीं सुसंबद्धहि नाहीं असें रशियांतील लोकशाहीच्या पुरस्कर्त्यांचें त्याला उत्तर आहे. विरोधी मतप्रदर्शनाला वाव असूं नये असें लोकशाहीच्या उपासकांचें म्हणणें नाहीं; परंतु लोकशाहीची मूलभूत कल्पना ज्यांना मान्य आहे अशांना व तोहि तपशिलाच्या कांहीं बाबींपुरता मर्यादित वाव असेल तरच त्याला कांहीं अर्थ आहे. मॉस्लेसारख्या फॅसिस्टाला ब्रिटनमध्यें मोकळीक मिळते ती तेथील लोकशाहीच्या मुळावर आघात करण्याचें सामर्थ्य त्याच्या मतप्रणालींत आज नाहीं म्हणूनच व जोंपर्यन्त तसें सामर्थ्य नाहीं तोंपर्यंतच, हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. पाश्चात्त्यांच्या सहिष्णुतेच्या कल्पनांना वस्तुतः कोणती मर्यादा आहे हें त्यावरून उघड होतें. परंतु यापेक्षांसुद्धां सहिष्णुतेच्या तत्त्वाचा अधिक खोल विचार झाला पाहिजे. तत्त्व म्हणून कोणतीहि गोष्ट मान्य करतांना तें निरपवाद असलें पाहिजे. तसें नसेल तर त्याला कोणताच ठाम असा नैतिक आधार राहत नाहीं. चांगल्या तसेंच वाईट या दोन्ही तऱ्हांच्या प्रवृत्तींना खुल्या स्पर्धेचें मैदान मोकळें सोडावें आणि ज्या बाजूला बहुमत मिळेल तें लोकशाहीसिद्ध समजावें असाच व्यवहारांत त्याचा अर्थ होतो. पाश्चात्त्यांच्या तऱ्हेची लोकशाही ही चांगल्या वाईटासंबंधीं पूर्ण तटस्थ आहे. तिच्यांतील सहिष्णुतेचा उगम या तटस्थतेमधूनच झाला आहे. सत्य कोणतें याविषयीं तिच्या ठिकाणीं ठाम असा विश्वास नाहीं. सापेक्षतेची ही परा कोटी आहे आणि त्यामुळें कोणत्याहि प्रश्नाविषयीं ठाम सत्याची बैठक तिला उरत नाहीं. बर्‌ट्रिन्ड या एके काळच्या मार्क्सवादी तत्त्वचिंतकाचा वरील अभिप्राय विचारांत घेतल्यास, पाश्चात्त्य लोकशाहीला कांहीं शाश्वत सत्य किंवा मूल्य शिल्लक राहात नाहीं. रशियांतील लोकशाहीवाद्यांना असला सहिष्णुताधर्म मान्य नाहीं. पाश्चात्त्य लोकशाहीवादी फॅसिस्ट मताच्या बाबतींतसुद्धां सहिष्णुता दाखवितात हा त्यांचा लोकशाहीवरील डळमळीत निष्ठेचाच पुरावा होय असें ते मानतात. या बाबतींत दुसऱ्याहि एका दृष्टीनें विचार केला जातो. जें विरोधी मत लोकशाहीच्या मुळावर उठणार नाहीं अशाला तरी पूर्ण अवसर असावा असें सरसहा प्रतिपादन करण्यांत येतें. परंतु जुनी आणि खोल लोकशाही परंपरा असलेल्या ब्रिटनसारख्या आणि एकजिनसी एकात्म अशा समाजांत अशी सहिष्णुता दाखविणें धोक्याचें ठरणार नाहीं हें एक वेळ मान्य करतां येईल. पण अल्पमताला अनिर्बंध स्वातंत्र्य देण्याच्या कल्पना इतरत्र सर्व समाजांत किंवा राष्ट्रांत तशाच व्यवहारांत आणणें लोकशाहीला मारक ठरण्याचा धोका आहे हेंहि विसरून चालणार नाहीं.

### जनतेचें स्वयंस्फूर्त सहकार्य

पाश्चात्त्य देशांतील लोकशाही कारभारांत, निवडणुकीच्या वेळीं एकदां मत नोंदण्यापलीकडे, सामान्य माणसाला काडीचाहि भाग घेतां येत नाहीं. या उलट, समाजवादी लोकशाहींत लेनिननें म्हटल्याप्रमाणें सामान्य जनता दैनंदिन कारभारांतहि प्रत्यक्ष सहभागी होते. सामान्य जनांना लोकशाहीच्या दैनंदिन व्यवहारांत सहभागी होण्याला अधिकाधिक मोकळीक मिळावी याच उद्देशानें












लेनिनप्रभृतींकडून नोकरशाही कारभारावर सतत प्रखर हल्ला चढविण्यांत आला आहे. युद्धकाळांत आणीबाणीच्या परिस्थितींत स्थानिक जनतेनें स्वयंस्फूर्त सहकार्य द्यावें यासाठीं भांडवलदार राष्ट्रांनीं आवाहन केलें आणि मागील युद्धांत संरक्षणाच्या कार्यांत ही कल्पना व्यवहारांत उतरली. तसें झालें नसतें तर युद्धप्रयत्न अपुरे ठरले असते. युद्धकाळांत ज्या कल्पनेचा पुरस्कार करण्यांत आला तीच गोष्ट शांततेच्या काळांत भांडवलदारी समाजानें कां स्वीकारूं नये हें कळत नाहीं. धोरणाची स्थूल रूपरेषा मध्यवर्ती सत्तेकडून ठरविली जावी यांत कांहीं वावगें नाहीं. परंतु ठरलेलें धोरण अंमलांत आणतांना तें नोकरशाहीवर विसंबून अंमलांत न आणतां जनतेच्या सहकार्यानें आणण्याचा परिपाठ पडला तर त्याला जनतेकडून उत्स्फूर्त सहकार्य मिळतें, एवढेंच नव्हे तर, सर्व समाज त्याविषयीं आत्मीयतेनें विचार करूं लागतो. असें होतें तेव्हांच लोकशाहीचें तत्त्व व्यवहारांत उतरल्याचें पाहावयास मिळतें. गांधीवाद्यांकडून सत्तेच्या विकेंद्रीकरणाचा पुरस्कार केला जातो त्यामार्गेंसुद्धां लोकशाही सत्ता अशा रीतीनें खालपर्यंत रुजविण्याचीच कल्पना आहे. गांधीवादी कल्पना नव्या लोकशाहीच्या या मुख्य कल्पनेशीं अंतिमतः जुळती आहे हें लक्षांत घेण्याजोगें आहे. रशियांतील नव्या लोकशाहीमार्गे असलेली सामान्य जनतेची ही निष्ठा हीच तिची ताकद आहे आणि याची जोड पाश्चात्त्य लोकशाहीला परिणामकारकपणें देतां येत नाहीं हेंच तिच्या अपयशाचें मर्मस्थान आहे.

### सर्वंकष नियोजन

रशियानें नियोजनाचा जो कार्यक्रम निर्धारानें व कठोरपणानें तडीला नेला त्याचा परिणाम आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट संघटनेपेक्षांसुद्धां भांडवलदारी अर्थव्यवस्थेवर मोठा झालेला आहे. वास्तविक मार्क्सनें स्वतः यासंबंधींचा निश्चित असा विचार किंवा आराखडा मांडलेला नाहीं. भांडवलदारी जगांतील उत्पादनव्यवस्थेंत अराजक बोकाळलें आहे हें त्यानें ठासून सांगितलें. त्या समाजाचें खोल निरीक्षण करून त्याची चिकित्सा त्यानें केली. पण भावी समाजव्यवस्थेचें चित्र त्यानें रेखाटलें नाहीं. कारण तो कल्पनावादी नव्हता. ऑक्टोबर क्रांतीनंतर 'आमच्याजवळ जुन्या व्यवस्थेंतून नव्या व्यवस्थेंत जाण्यासाठीं पूर्वनियोजित योजना नव्हती' असें लेनिननेंच म्हटलें आहे. त्यानंतर क्रांतीच्या नेत्यांनीं नियोजनाचा प्रश्न धसाला लावला. त्यांनीं त्यासंबंधीं पुष्कळ चर्चा आणि खल केला. त्यामधूनच नियोजनाचा कार्यक्रम नक्की झाला. तोच कार्यक्रम हातीं घेऊन २७ सालीं स्टॅलिननें रशियांत दुसरी क्रांतीच केली!

या वेळीं बाहेरचें भांडवलदारी जग मंदीच्या भोवऱ्यांत सांपडलें होतें. रशियानें पहिली पंचवार्षिक योजना हातीं घेतल्यामुळें बाहेरच्या जगाला भेडसावणारे बेकारीसारखे प्रश्न रशियापुढें उरले नाहींत. त्यामुळेंच बाहेरच्या जगांतील विचारवंत रशियाच्या नियोजनाच्या कार्यक्रमाकडे आकर्षित झाले. रशियाची पंचवार्षिक योजना यशस्वी झाल्यामुळें बाहेरच्या जगाला या ना त्या स्वरूपांत नियोजनाचा पुरस्कार करावा लागला. नियोजनाच्या नव्या कल्पनेचें जनकत्वच अशा रीतीनें रशियाकडे जातें.

पूर्वीं जर्मनीमध्यें फ्रेडरिक लिस्टसारख्यांनीं नियोजनसदृश कल्पना पुढें मांडलेली होती; परंतु त्याचें उद्दिष्ट केवळ राष्ट्रीय उद्योगधंद्याच्या वाढीपुरतें मर्यादित असेंच होतें. रशियाच्या नियोजनाच्या धोरणांत राष्ट्रीय आणि सामाजिक अशा दोन्ही अंगांचा पूर्ण मिलाफ झालेला आहे, यांतच त्याचें क्रांतिकारक वैशिष्ट्य आहे. रशियानें हातीं घेतलेलें नियोजन हें सर्वंकष स्वरूपाचें होतें आणि जुन्या अर्थव्यवस्थेंतून नव्या अर्थव्यवस्थेंत जातांना जी प्रक्रिया होते ती ध्यानांत घेऊन हें नियोजन केलेलें होतें. सर्व समाजाच्या गरजांचा विचार त्यामागें होता. समाज काय निर्माण करतो आणि कोणता वांटा स्वतः उपभोगतो याचा हिशोब त्यांत होता. रशियाला मंदीची झळ लागली नाहीं, बेकारी नाहींशी झाली हे केवळ त्याचे परिणाम आहेत.

युद्धकाळांत किंवा तात्कालिक आर्थिक अरिष्टाला तोंड देतां यावें यासाठीं नियोजनाचा विचार भांडवलदारी जगाला सुचतो. परंतु रशियाचें







नियोजनाचें धोरण तसें नाहीं, हें यावरून ध्यानांत येईल. क्रमवारीचें नियोजनांतील महत्त्व रशियानें पूर्णपणें ओळखल्यामुळें आकाशाला गवसणी घालण्याच्या कल्पनावादाला तेथें थारा नाहीं. चलनाचा विशिष्ट रीतीनें उपयोग करून अथवा अन्य जुजबी उपायांनीं मंदीच्या लाटेंतून कसें तरी बाहेर पडावें असें कामचलाऊ धोरण त्यामागें नाहीं. नेहमींचीच अर्थव्यवस्था नियोजनपूर्ण असावी, सामाजिक धोरणाचा त्यांत अंतर्भाव व्हावा व प्रत्येकाचें कर्तव्य आणि हक्क यांचाहि विचार त्यांत केलेला असावा इतकें तें व्यापक असलें पाहिजे. आणि म्हणूनच नियोजन हा नव्या समाजव्यवस्थेचा आत्माच आहे. त्यामागें भौतिक तशीच नैतिक प्रेरणाहि आहे.

" भांडवली अर्थव्यवस्था ही पूर्णपणें अधार्मिक आहे. पुंजीवाले मालक आणि त्यांच्यामागें धावणारे वित्तैषणेनें हपापलेले लोक यांनीं बनलेल्या या अर्थव्यवस्थेंत एकात्मता नाहीं, समाजहितबुद्धि नाहीं " या शब्दांत प्रा. केन्सनें भांडवली जगाचें वर्णन केलें आहे. त्या जगाच्या पुरस्कर्त्यांला जुन्या जगाचे जे हे अंगभूत दोष दिसले तेच नियोजनाच्या समाजनिष्ठ धोरणामुळें रशियाला दूर करतां आले. वरील व्याधींनीं जर्जर झालेल्या भांडवली जगावर रशियांतील नव्या संस्कृतीमागील अर्थकारणाचा मोठा प्रभाव पडावा आणि त्यासंबंधीं एक प्रकारचें गूढ आकर्षण निर्माण व्हावें हें स्वाभाविकच नव्हे काय ?

## नवें जीवनव्यापी तत्त्वज्ञान

नव्या जगाची उभारणी ज्या तत्त्वज्ञानावर होत आहे त्यायोगें जुन्या जगाची तत्त्वज्ञानाची बैठकच ढांसळली आहे. कारण कम्युनिझम हा कांहीं केवळ एक राजकीय कार्यक्रम नाहीं; तें समाजजीवनाचें एक नवें दर्शनच आहे. हें तत्त्वज्ञान नव्या जगाचा धर्म बनलें आहे; त्यामुळें त्याची आत्मिक श्रद्धाहि तेवढीच बळकट आहे. राज्यसत्तेमागील प्रेरक शक्ति या तत्त्वज्ञानामधून आलेली असली, तरी जीवनाचे इतर व्यापारहि त्यांतून सुटत नाहींत. तेथील सत्तेकडून होणारी प्रत्येक गोष्ट या तत्त्वज्ञानाच्या निकषावर पारखून घेतली जात असल्यामुळें ती वरकरणीं अनियंत्रित वाटली तरी वस्तुतः ती तशी नाहीं, हें समजून येईल. येथील नव्या समाजरचनेनें बाहेरच्या जगावर केवढा मोठा आघात केला आहे हें भांडवलदारी जगांतील प्रतिक्रियेवरून ध्यानांत येतें. कारण कित्येक वेळां विरोधकांकडून ज्यांचा आत्यंतिक धिक्कार केला जातो त्यांनाच त्याचें आकर्षण किती प्रभावी आहे हें खरोखर समजलेलें असतें. १९१८ नंतर पाश्चात्य लोकशाहीला उतरती कळा लागली हा परिस्थितीचा परिणाम तर होताच, परंतु तेथील समाजाच्या जीवनाला निष्ठेचा भक्कम आधार उरलेला नव्हता हेंहि तितकेंच महत्त्वाचें कारण होतें. कारण नव्या तत्त्वज्ञानांत प्रत्ययास येणारा रसरशीतपणा, नैतिक उभारी, विजिगीषु वृत्ति आणि जीवननिष्ठेबद्दल सुसंवाद हीं जुन्या लोकशाहींत आतां उरलीं नाहींत, याची जाणीव बाहेरल्या जगांत सर्वत्र फैलावली होती. नव्या जगाच्या उदयानें भांडवलदारी समाजांतील आधींच डळमळीत झालेल्या श्रद्धेला अधिकच जोराचा धक्का बसला. हाच नव्या तत्त्वज्ञानाचा मोठा विजय होय.

साम्यवाद ही केवळ क्रांतिशक्ति नाहीं. जुनें जग उध्वस्त करून त्याचा नाश करावा हेंच केवळ त्याचें उद्दिष्ट नाहीं. त्यापेक्षां त्याची विधायक बाजू फार मोठी आहे. कोणत्याहि सामाजिक शक्तींचा पहिला आविष्कार क्रांतिकारक विध्वंसनांत होत असला तरी त्यामधील विधायक शक्ति मागाहून प्रकट होते, हा समाजविकासाच्या इतिहासाचा सिद्धान्त समजून घेतला पाहिजे. खिस्ती धर्मानें प्रथम रोमची संस्कृति उध्वस्त केली आणि त्यांतून पुढें आपल्या कल्पनेनुसार एका नव्या व्यवस्थेची मांडणी केली. नव्या तत्त्वज्ञानाच्या विध्वंसक तशीच विधायक अशा दोन्ही बाजू ध्यानांत घेतल्या पाहिजेत.

" मनुष्य हा आपला स्वतःचा विधाता आहे. तो आपला इतिहास बनवितो. अर्थात् ज्या परिस्थितींत तो राहतो तिच्या स्वाभाविक मर्यादेंतच त्याचें कर्तृत्व प्रगट होतें. त्याच्या बाह्यसंबंधांमध्यें आर्थिक संबंधांना विशेष प्राधान्य असतें. राजकीय व अन्य समजुतींचा पगडा कितीहि असला तरी








## सोव्हिएट नवसंस्कृतीनें केलेली विचारक्षेत्रांतील क्रांति

आर्थिक संबंधच खरे निर्णायक असतात. आणि ज्या अनेक बंधनांनीं समाजजीवनाचें जाळें तयार होतें त्यामध्यें आर्थिक संबंधांचें सूत्र सर्वत्र पाहावयास मिळतें." या आशयाच्या एंगल्सच्या उद्‌गारांत, अंतिम सत्य हें भौतिक आहे आणि त्यांत अर्थहेतु प्रधान आहे या मार्क्सच्या सिद्धांताचें सार ग्रथित झालेलें आहे. या सिद्धान्तानें अध्यात्मिक कल्पनावाद मिथ्या ठरविला आणि जुन्या समजुती आणि प्रतिष्ठा यांना जबर धक्का दिला. समाजजीवनांत आणि वैचारिक क्षेत्रांत भौतिक परिस्थितीच्या विचाराला म्हणजेच आर्थिक प्रश्नाला जें महत्त्व प्राप्त झालेलें आज दिसत आहे त्याचा उगम मार्क्सवादांत किंवा त्या विचाराची जी सांस्कृतिक वाढ रशियांत झाली तींत पाहावयास मिळतो.

सत्याचा विचार आत्मचिंतनानें करण्यापेक्षां इतिहासाच्या अनुरोधानें झाला पाहिजे ही कल्पना मार्क्सवादामुळें दृढमूल झाली. इतिहासाची संगति या नव्या दृष्टीनें लावण्याची पद्धति या तत्त्वज्ञानानें शिकविली. तसेंच नव्या सापेक्षतासिद्धान्तानें व्यक्ति-माहात्म्यालाहि मोठा धक्का दिला. व्यक्तींचें स्वतंत्र व स्वयंभू कर्तृत्व हें मर्यादित आहे. सामाजिक परिस्थिति तिच्या विचाराची घडण बनविते आणि सामाजिक परिस्थितिसुद्धां इतिहासाच्या विकासक्रमांतील एक टप्पा आहे, अशी या तत्त्वज्ञानाची नवी मांडणी झाल्यामुळें, जुन्या जगाच्या समजुतींचा सर्व आधार कोसळला. या सर्व कल्पना कम्युनिस्ट जाहीरनाम्यांत गोंवल्या होत्याच, तोंपर्यन्त त्यांचा प्रभाव मर्यादित होता. गेल्या तीस वर्षांत या नव्या तत्त्वज्ञानानुसार एका मोठ्या मानवसमाजाची नवी रचना करण्यांत आली, नव्या विचारांची सांस्कृतिक वाढ झाली. त्यामुळें बाहेरच्या भांडवलदारी जगावर आतां त्याचा झालेला आघात किती मोठा असेल याची कल्पनाच केलेली बरी !

समाजाच्या जुन्या श्रद्धांना धक्का देणारी नव्या तत्त्वज्ञानाची ही एक बाजू झाली. त्याची विधायक बाजूहि तेवढीच मोठी आणि उदात्त आहे. कामगार हा या नव्या संस्कृतीचा पाईक आहे. समाजांतील वर्गीय संघर्ष नाहींसा करून वर्गरहित अशा नव्या समाजाचा पाया घालण्याचें कम्युनिस्ट जाहीरनाम्यांत घोषित केलेलें ध्येय त्या वर्गाच्या हातीं शासनयंत्र आल्यावांचून साधणार नाहीं. वरील विचार श्रमिकवर्गाच्या उद्धाराच्या तळमळींतून निघाल्यामुळें त्याला जबर नैतिक सामर्थ्य प्राप्त झालें. रशियांतील क्रांतीचें वैशिष्ट्य यापूर्वीं झालेल्या सर्व क्रांत्यांहून वेगळें आहे. पूर्वीं झालेल्या क्रांतींमध्यें सत्ताधारी वर्ग बदलला तरी नव्या स्वरूपांत पिळवणूक चालूच राही. कोणत्याहि स्वरूपांत समाजांत शोषणाला वाव किंवा संधि मिळूं नये, हें या नव्या क्रांतीचें वैशिष्ट्य होतें. कामगारवर्गाच्या अनियंत्रित सर्वाधिकारशाहीचें हेंच उद्दिष्ट आहे. या क्रांतीमुळें मानवी समाजाच्या इतिहासाचा पूर्वींचा दुवा तोडला गेला आहे असें स्टॅलिन म्हणतो यांतील मर्म, वरील विचारामागील खोल अर्थ ध्यानीं घेतल्यास, सहज समजून येईल. ही क्रांति राजकीय नसून सामाजिक आहे आणि तिचें मूल्य हें व्यक्तिमूल्य नसून समाजमूल्य आहे.

रशियांत झालेली क्रांति आणि तिच्यामधून निर्माण झालेला कामगार-संस्कृतीचा विस्तार यांनीं आधुनिक इतिहासाला निश्चित निराळें वळण लावलेलें आहे हें निर्विवाद होय.

---

## शिल्पकार

विश्वकर्म्याची एक ओबडधोबड शिल्पाकृति त्यानें तयार केली. खालीं शिल्पकार म्हणून सुंदर अक्षरांत आपलें नांव कोरलें. त्या शिल्पमूर्तीचें नांव मात्र त्याला लिहितां आलें नाहीं. कारण तें कोणालाच माहीत नव्हतें.

अनंत विश्वाचें शिल्प घडवितांना आपलें नांव कुठें कोरून ठेवण्याची दक्षता त्या महान् शिल्पकारानें कधींच दाखविली नव्हती !

—देवदत्त दाभोलकर

( कल्पना इंग्रजींतून उद्धृत )








श्री. ना. ग. गोरे

# सामाजिक परिषदेचा पुनश्च हरिः ॐ

" You cannot have a good social system when you find yourself low in the scale of political rights; nor can you be fit to exercise political rights and privileges unless your social system is based on reason and justice. You cannot have a good economical system when your social arrangements are imperfect. If your religious ideals are low and grovelling, you cannot succeed in social, economic or political spheres. This inter-dependence is not an accident but is the law of nature." —न्यायमूर्ति रानडे

( सातारा येथील भाषणांतून : इ. स. १९०० ).

" राजकीय अधिकारांच्या बाबतींत आपण मागसलेले असतांना आपणाला अव्यंग अशी समाजव्यवस्था उपलब्ध होणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें आमची समाजव्यवस्था जों पावेतों सद्‌बुद्धीवर व न्यायावर आधारलेली नसेल तों पावेतों राजकीय अधिकारांचा वापर करण्याची पात्रता प्राप्त होणें हें सुद्धां अशक्यच आहे. सामाजिक रचनेंत दोष असेपर्यंत निर्दोष आर्थिक रचना करतां येणार नाहीं आणि आपल्या धर्मविषयक कल्पना जोंपर्यंत हीन व पतित अशा असतील तोंपर्यंत आपणाला सामाजिक, आर्थिक वा राजकीय क्षेत्रांत यश मिळविणें दुर्घट होणार. हें परस्परावलंबित्व केवळ योगायोगाची गोष्ट नसून तें निसर्गनियमांनीं सिद्ध असेंच आहे. "

कै. न्यायमूर्ति रानड्यांच्या विचारसरणीची कल्पना वर दिलेल्या त्यांच्या भाषणांतील उताऱ्यावरून करतां येण्यासारखी आहे. हिंदुस्थानला पारतंत्र्य प्राप्त झाल्यानंतर त्याच्या स्वातंत्र्यासाठीं उद्युक्त झालेल्या व्यक्तींमध्यें जे ठळक असे दोन मतप्रवाह दिसून येतात त्यांपैकीं एका प्रवाहाचें दिग्दर्शन वरील उतारा करून देत आहे. रानड्यांच्या ह्या उद्गारांमध्यें राजा राममोहन रॉय, महात्मा फुले, लोकहितवादी आदीकरून समाजसुधारकांच्या विचारांतला सत्वांश उतरलेला आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. ज्या दोन मतप्रवाहांचा आतांच उल्लेख मीं केला त्यांपैकीं दुसऱ्या मतप्रवाहामध्यें ही सर्वंकष बुद्धि प्रतिबिंबित झालेली नव्हती. त्या मतप्रणालीचें प्रवर्तन आणि प्रतिनिधित्व करणाऱ्यांनीं समाजविकसनाच्या चतुर्विध अंगांपैकीं राजकीय अंगावरच विशेष भर दिला आणि पारतंत्र्याची हवा त्या विचारसरणीच्या परिपोषाला फारच अनुकूल ठरली. परतंत्र देशाची सहज प्रवृत्ति बहिर्मुख होण्याकडेच असते, अंतर्मुख होण्याकडे नसते. आपल्या सामाजिक, आर्थिक व नैतिक अधःपातास आपलें राजकीय दास्य कारणीभूत आहे. ही भूमिका समाजाच्या युयुत्सु वृत्तींना वाव करून देत असतांनाच समाजांतील रूढिप्रियतेला संरक्षण देणारी असल्याकारणानें, साहजिकच ती जोमानें प्रसार पावते. त्यांतून समाजस्थित्यंतराचा आग्रह धरणारे लोक राजकीय सत्तांतराविषयीं कोमट अथवा उदासीन वृत्ति धारण करतात असें दिसूं लागलें म्हणजे तर त्यांचा समाजपरिवर्तनाबद्दलचा आग्रहहि शंकास्पद ठरूं लागतो, बुद्धिभेदाच्या प्रयत्नासारखा भासूं लागतो. कै. आगरकरांना अकालीं निधन न येतां तें जगते वांचते, तर महाराष्ट्रांत राजकीय परिवर्तनाचे व समाजपरिवर्तनाचे प्रयत्न सारख्याच जोमानें एकसाथ चालू राहिले असते किंवा कसे, हा विचार

करण्यासारखा प्रश्न आहे. परंतु राजकीय व सामाजिक अशा दोन आघाड्यांपैकीं १९०६ सालापासून किंवा त्याच्या जरा आधींपासूनच सामाजिक आघाडी ढिली पडूं लागली आणि १९१८ मध्यें तर ती जवळ जवळ मृतप्रायच झाली. तदनंतरच्या काळांत सत्यशोधक समाजातर्फे ब्राह्मणेतर समाजांत आणि दलित फेडरेशनतर्फे अस्पृश्य समाजांत सामाजिक अन्यायाचें परिमार्जन करण्यासाठीं तीव्र आंदोलनें करण्यांत आलीं. त्यांच्यायोगानें समाज ढवळून निघून त्याचे कांहीं सुपरिणाम घडून आले हें खरें. तथापि, लेखाच्या शिरोभागीं रानड्यांनीं जी समग्र अन्योन्याश्रयी दृष्टि मांडलेली आहे तिच्यांतील सर्वंकषता, समुदारता किंवा विधायकता त्या चळवळींच्या मुळाशीं होती असें म्हणवत नाहीं. १८९७ सालीं उमरावतीच्या व्यासपीठावरून रानड्यांनीं काढलेल्या पुढील उद्गारांची[1] विमलता महात्मा गांधींच्या जीवनदर्शनाची सूचक वाटते. त्यांचे उद्गार असे : " निसर्गातील प्रकाश आणि चैतन्य समाजसुधारकांनीं आपल्या अंगीं बाणविलीं पाहिजे. स्वतःची आणि आपल्या भोंवतालच्या जगाची विशुद्धि करूनच त्याला ही गोष्ट साधतां येईल. त्यानें आपलें गांव, आपली जात व आपलें राष्ट्र ह्यांना नव्या मुशींत ओतावयास हवें. हें करण्याची आवश्यकता असल्यामुळें समाजसुधारणा करणें हा एक धर्म ठरतो. मन मानेल तेव्हां हात झाडून मोकळें होण्यासारखी ती दोन घटका करमणुकीची चीज नव्हे. "

एवढ्या उदात्त व सुस्पष्ट भूमिकेचें पाठबळ असूनसुद्धां आणि महात्मा गांधींची भूमिका ह्या भूमिकेशीं सुसंवादी असूनसुद्धां रानडे, आगरकर व गोखले यांच्या अनुयायांना १९१८ सालीं काँग्रेसपासून आपली फारकत करून घ्यावीशी वाटली ही खेदाची गोष्ट होय. गांधीजींनीं राष्ट्रीय आंदोलनाला दिलेल्या नवीन स्वरूपामुळें, स्त्रीदास्यविमोचन, अस्पृश्यता-निवारण, आदिवासींची सेवा इत्यादि सर्वच बाबतींचा अंतर्भाव तिच्यांत झालेला असल्याकारणानें, सामाजिक परिषदेचें एक स्वतंत्र व्यासपीठ पुढें चालविण्याची आवश्यकता त्यांना भासली नसावी आणि सुधारकांचें दल मुख्य राजकीय आघाडीपासून माघारीं फिरल्यामुळें अखिलभारतीय स्वरूपाच्या सामाजिक परिषदा बंद पडल्यानंतर त्यांनीं जरी प्रांतिक परिषदा भरविण्याचा क्रम पुढें आणखी दहा वर्षें चालू ठेवला असला तरी त्यांत पूर्वींचें तेज नंतर कधींहि आढळलें नाहीं. १९२८ सालानंतर जुन्या पिढीच्या लोकांच्या मनांत सामाजिक परिषद् स्मृतिरूपानें काय जिवंत राहिली असेल तेवढीच.

म्हणून तब्बल २५ वर्षें लोटल्यानंतर पुण्यामध्यें एप्रिलच्या १८, १९ व २० तारखांना **महाराष्ट्र सामाजिक परिषदेचें** जें अधिवेशन भरलें होतें, तिचें महत्त्व विशेष आहे असें मला वाटतें. १९४७ च्या १५ ऑगस्टला हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यानंतर रानड्यांच्या काळीं ज्यावर रणें माजलीं तो ' आधीं राजकीय कीं आधीं सामाजिक ? ' हा वादाचा विषयच मुळीं निकालांत निघालेला होता. राजकीय स्वातंत्र्य प्राप्त होऊन ५ वर्षें लोटून गेलीं असलीं तरी आमच्या समाजांतील जीं अनेक वैगुण्यें आहेत त्यांचें अद्यापि निराकरण झालेलें नाहीं. उलट, तीं आमच्या प्रगतीमध्यें पदोपदीं अंतराय आणीत आहेत. १८९६ सालीं न्या. रानड्यांनीं मुंबईमध्यें केलेल्या एका भाषणामध्यें असा इशारा देऊन

१. " The reformer has to infuse in himself the light and warmth of Nature and he can only do it by purifying and improving himself and his surroundings. He must have his village, tribe & nation recast into other and new moulds and that is the reason why social reform becomes our obligatory duty and not a mere pastime which might be given up at pleasure."









अनुक्रमणिका

ठेविला होता कीं,[२] " तुम्हांला प्रगतिवाद अर्धवट आचरतां येणार नाहीं. राजकारणामध्यें प्रगतिवादी आणि धर्मकारणामध्यें परागतिवादी असून चालणार नाहीं...आपल्या राजकीय अधिकारासाठीं सत्ताधाऱ्यांबरोबर जे निकरानें झगडत आहेत ते लोकभ्रमांना आणि दुष्ट रूढींना चिकटून बसण्यास तयार होतील असें समजणें म्हणजे भोंगळ स्वप्नाळूपणा होय. लौकरच हीं स्वप्नें विरून गेल्याचें त्यांना आढळून येईल. "

न्या. रानड्यांच्या उपर्युक्त विचारसूत्रांचें जणूं कांहीं वार्तिकच डॉ. आंबेडकरांनीं भारतीय राज्यघटनेवरील आपल्या शेवटच्या भाषणामध्यें केलेलें आहे. २६।११।१९४९ रोजीं केलेल्या आपल्या विस्तृत भाषणामध्यें त्यांनीं असे उद्‌गार काढलेले आढळतात कीं, " आपण केवळ राजकीय लोकशाहीवर संतुष्ट राहतां कामा नये. आपण आपली राजकीय लोकशाही सामाजिक लोकशाहींत रूपांतरित केली पाहिजे. आपल्या लोकशाहीचा राजकीय पाया जर सामाजिक लोकशाहीनें भरलेला नसेल तर ती टिकूं शकणार नाहीं. पण सामाजिक लोकशाही म्हणजे तरी काय ? या लोकशाहीचा असा अर्थ आहे कीं, स्वातंत्र्य, समता व बंधुता हीं तत्त्वें ज्या जीवनांत अंतर्भूत झालेलीं आहेत तें जीवन. स्वातंत्र्य, समता व बंधुता हीं तीन तत्त्वें वेगवेगळीं नाहींत. त्या तिघांचा मिळून एक संच आहे. त्या तिघांची मिळून एक त्रिगुणात्मक मूर्ति आहे. "

लोकमान्य टिळकांच्या विचारसरणीवर जे त्यांच्या निधनापासून गेलीं ३० वर्षें वारसा-हक्क सांगत आलेले आहेत त्यांना १९२० नंतरचें राजकारण जसें समजलें नाहीं त्याचप्रमाणें स्वातंत्र्योत्तर कालामध्यें केवळ अपरिहार्य होऊन बसलेला हा समाजपरिवर्तनाचा प्रश्नहि जर त्यांना समजला नाहीं, तर त्याचें आश्चर्य वाटावयास नको व त्याबद्दल विषादहि वाटावयास नको ! सामाजिक परिवर्तनाला बुद्धिपुरस्सर पाठिंबा देण्याची व केवळ कायद्याच्या चालीवर विसंबून न राहतां त्याचा प्रसार करण्याची आवश्यकता महाराष्ट्रांतील राजकारणाच्या क्षेत्रांत प्रौढपणानें वावरणाऱ्या सर्व राजकीय पक्षांना पटली आणि **महाराष्ट्र सामाजिक परिषदेच्या** व्यासपीठावर एकत्र येऊन, समाजाच्या विविध क्षेत्रांत पक्षातीत राहून कार्य करणाऱ्या व्यक्तींशीं त्यांनीं सहकार्य केलें, हें एक सुचिन्ह समजलें पाहिजे. अव्वल इंग्रजी आणि अखेर इंग्रजी हीं दोन्ही टोंकें पाहाण्यास मिळण्याएवढें दीर्घायुष्य ज्यांना लाभलें ते **महर्षि अण्णासाहेब कर्वे** ह्या परिषदेला आशीर्वाद देण्यासाठीं मिळाले आणि त्यांच्या उपस्थितीमुळें ह्या परिषदेचा दुवा एका पिढीपूर्वीं लुप्त झालेल्या परंपरेशीं सहजच सांधला गेला हाहि योग उत्साहजनक ठरावा असाच होता ! ' आपलें खरें कार्य अजून पुढेंच आहे, ही परिषद् म्हणजे कार्यारंभाची नुसती तुतारी आहे ' याची जाणीव महर्षि कर्वे यांनीं आपल्या उद्‌घाटनाच्या भाषणामध्यें करून दिली आणि ही परिषद् महाराष्ट्रापुरती भरविलेली असली तरी अखिल-भारतीय परिषदेची ती उपक्रम ठरावी, असा आशीर्वादात्मक आशावादहि त्यांनीं प्रकट केला. **स्वागताध्यक्ष श्री. बाबूराव जगतापांसारख्या** शिक्षणाला आपलें आयुष्य वाहिलेल्या व्यक्तीनें आपल्या भाषणामध्यें लोकशिक्षणावर विशेष भर द्यावा हें युक्तच होय. **अध्यक्ष न्यायमूर्ति गजेंद्रगडकर** यांचें मुख्य भाषण आशयाचा प्रगल्भपणा, विचारांचें सौम्य पण निश्चित व्यक्तीकरण आणि बुद्धीची सर्वंकषता ह्या दुर्मिळ गुणांची साक्ष देणारें होतें. महाराष्ट्रांत सामाजिक परिषदेचें खंडित झालेलें सूत्र पुन्हां चालू करण्याचा प्रारंभ होत असतां जसें मार्गदर्शन व्हावयास हवें होतें तसेंच समुचित

२. " You cannot be liberal by halves; you cannot be liberal in politics and conservative in religion...It is an idle dream to expect men to remain enchained and enshackled in their own superstition and social evils, while they are struggling hard to win rights and privileges from their rulers. Before long, these vain dreamers would find their dreams lost. "








# सामाजिक परिषदेचा पुनश्च हरिः ॐ

मार्गदर्शन अध्यक्षीय भाषणानें केलें. अध्यक्षांनीं केलेलें भाषण आणि तदनंतरच्या कार्यक्रमांत त्यांनीं वारंवार अंगीकारिलेली भूमिका ह्यांमुळें मला तरी असें वाटलें कीं, ह्या परिषदेच्या निमित्तानें आपल्या प्रांतांत आणखी एका गुणवान् व्यक्तीचा उदय झालेला पाहावयास मिळाला ! महात्मा फुल्यांच्या पासून साने गुरुजींच्या पर्यंत महाराष्ट्रांत ज्या ज्या थोर व्यक्तींनीं येथील समाजांत परिवर्तन घडवून आणण्यासाठीं चिंतन व कष्ट केले त्या सर्वांच्या प्रयत्नांचा आपण केवळ परिचयच करून घेतलेला नसून, आपण त्यांचें मनन करून ते पचविलेले आहेत, ह्याचा निर्वाळा त्यांचें भाषण देत आहे. न्यायमूर्ति रानड्यांच्या विचारांचे जवळजवळ सर्व पैलू ह्या न्यायमूर्तींच्या भाषणांत आलेले पाहून कोणाला आनंद होणार नाहीं ! " जातीयता-निर्मूलनाचे प्रयत्न समाजसुधारक करूं लागले म्हणजे कित्येक वेळीं त्यांना असें बजाविण्यांत येतें कीं, या प्रयत्नांचा एकच परिणाम होईल आणि तो म्हणजे समाजसुधारकांची एक निराळी जात होणें हा होय. पूर्वीं असे प्रकार घडले नाहींत असें नाहीं. पण आजचा समाजसुधारक बुद्धि-वादाचें हत्यार हातांत घेऊन सामाजिक शिक्षणा-च्या मोहिमेवर निघाल्यानंतर समाजांत सर्वस्वीं मिसळून व समाजाचा एक घटक या नात्यानें समाजसुधारणा करण्याचा प्रयत्न करणार असल्या-मुळें, तो अगर त्याचे सहकारी हे समाजापासून अलग राहून त्यांचा एक निराळाच वर्ग उत्पन्न होईल, ही भीति बाळगण्याचें कारण नाहीं. " अध्यक्षांच्या वरील विचारांचें रानड्यांनीं पुण्यांत १८९५ सालीं गाजलेल्या सामाजिक परिषदेच्या व्यासपीठावरून काढलेल्या उद्गारांशीं केवढें संवादित्व आहे तें पाहाण्यासारखें आहे. न्यायमूर्ति रानड्यांचे ते उद्गार असे आहेत : " ह्या प्रांता-( मुंबई ) मधील आमच्या चळवळींचें वैशिष्ट्य हें आहे कीं, एकाच चाकोरीमधून काम करण्याची आमची इच्छा नाहीं. आम्हांला विविध मार्गांचा स्वीकार करावयाचा असून गतकाला-बरोबरचा संबंध तर आम्हांला मुळींच तोडावयाचा नाहीं आणि समाजापासून फटकून राहावयाचें नाहीं...आम्ही आमचा जर पृथक् गोट करून राहिलों आणि उरलेल्या समाजानें त्याला जसें हवें तसें वागावें असें धोरण ठेवलें तर मग आम्हांला कोणी उपद्रव देणार नाहीं. कारण आमच्या प्रतिगामी मित्रांना आणि सनातनी गटांना आम्हीं नेमकें हेंच करावयास हवें आहे. "

परिषदेचें उद्दिष्ट पहिल्या ठरावान्वयें ठरल्या-नंतर त्याच्या पाठोपाठ आलेल्या कार्यक्रमात्मक ठरावावर जो मतभेद दिसून आला त्यामुळें महाराष्ट्रीय समाजाच्या अंतरंगाचें यथार्थ दर्शन झालें असें मला वाटतें. परिषदेच्या टीकाकारांना त्यामुळें कदाचित् आनंद होईल. मलाहि ती आनंदाची गोष्ट वाटते; पण ती अशासाठीं कीं, मतभेद दाबून न ठेवतां खुलेपणानें मांडले गेले आणि मग त्यांतून तडजोडहि निघाली. समाजपरिवर्तनाला इष्ट दिशा लागावयास हवी असेल तर सद्यःकालीन समाज कोठवर पोंचलेला आहे हें आधीं कळलें पाहिजे. त्याची कल्पना दुसऱ्या ठरावावर व्यक्त झालेल्या मतभेदानें आली. महाराष्ट्रांतील जातिवाचक शिक्षणसंस्था ह्या आपद्धर्म म्हणून आणखी दहा वर्षें चालूं द्याव्या यास मान्यता देण्यांत परिषदेनें कांहीं तरी भयंकर केलें, स्वतःच्या तत्त्वांना हरताळ फांसला असें मला कांहीं वाटत नाहीं. अशा संस्था चालवाव्या लागणें ही परिस्थितीशीं तडजोड असून तत्त्वांत उणेपणा आहे ह्या मान्यतेला मी अधिक महत्त्व देतों. कारण त्यामुळें जातिभेदांचें शिक्षणांत रिघलेलें मूळहि छुलें बनतें आणि तें उपटून काढणें सुलभ होतें. महाराष्ट्रामध्यें गांवगन्ना पसरलेल्या ७० टक्के समाजांत १० टक्क्यांहून अधिक साक्षरता नाहीं आणि जनतेपैकीं ७ टक्के असणाऱ्या पांढरपेशांत २७॥ टक्के साक्षरता— म्हणजे संपूर्ण साक्षरतेहून फक्त २॥ टक्केच कमी— आहे. हा फरक दूर करण्यासाठीं करावे लागणारे सर्व उपक्रम सरकार स्वतः करण्याचें आश्वासन देईल तर दहा वर्षांच्या मुदतीचाहि आग्रह नाहीं, हा परिषदेच्या व्यासपीठावरून देण्यांत आलेला निर्वाळा माझ्या मतें महत्त्वाचा आहे. जातिभेदाच्या समूळ उच्चाटनाची मागणी करून आपापल्या संस्थांत जातिभेद साक्षेपानें जतन करणाऱ्यांपेक्षां








एखाद्या उपक्रमांत आम्हांला आज शंभर टक्के तत्त्व पाळतां येत नसलें, तरी त्याच्या दिशेनें जाण्याचा आम्ही प्रयत्न करीत आहों व करीत राहूं असें खुलेपणानें सांगणारे प्रगतीला अधिक सहायक ठरतील असें माझें मत आहे.

परिषदेच्या कामांत मला जें वैगुण्य दिसलें तें असें कीं, त्यामध्यें ठरावांचा फापटपसारा निष्कारण मांडण्यांत आलेला होता. एकंदर एकवीस ठराव सात-आठ तासांच्या तुटपुंज्या काळांत अक्षरशः भाजून काढण्यांत आले ! त्यापेक्षां परिषदेचें उद्दिष्ट ( पहिला ठराव ), जातिनिर्मूलन ( दुसरा ठराव ), हिंदु कोड बिल ( पांचवा ठराव ), स्त्रियांचे हक्क, दर्जा व गरजा ( सहावा ठराव–यांतच सातवा ठराव समाविष्ट करतां आला असता ), अस्पृश्यता-निवारण व भंगी-विमोचन ( आठवा ठराव ), शिक्षण ( दहावा ठराव ) आणि परिषदेची घटना ( एकविसावा ठराव ) एवढे सातच ठराव जर परिषदेनें घेतले असते तर परिषदेला पुढें प्राप्त झालेलें कंठाळी स्वरूप आलें नसतें आणि परगांवांहून मुद्दाम आलेल्या प्रतिनिधींना आपले विचार मांडण्यास अवसर मिळाला असता. प्रतिनिधींचा परस्परपरिचय इत्यादि मामुली वाटणाऱ्या पण भावी कार्याच्या दृष्टीनें अतिशय उपयुक्त अशा गोष्टी करण्यासहि फुरसत राहिली नाहीं. विषयनियामक समिति आणि प्रकट अधिवेशन यांमध्यें अध्यक्षांचा हस्तक्षेप, अशा परिषदांमधून अनेक वेळां भाग घेतलेल्यांना जाचक वाटण्याइतका होत होता. याचें कारण उघडच असें दिसलें कीं, मतभेद माजूं नये ह्याबद्दलची अध्यक्षांना वाटणारी आवश्यकतेहून अधिक चिंता आणि विषयनियामक समितीकडून जबाबदारीची जी वांटणी व्हावयास हवी होती तिचा अभाव. दोन उदाहरणें देतों : परिषदेचें सामान्य धोरण हा ठराव म्हणजे परिषदेच्या भूमिकेच्या पायाचा चिराच होय. पण तो ठराव ज्या प्रा. अळतेकरांनीं मांडला त्यांचा त्या भूमिकेवर विश्वास आहे कीं ते तिची थट्टा करीत आहेत, असा संशय ऐकणाऱ्याला यावा असें कांहीं तरी मिशमिशीत ते बोलले ! मुळांत ज्यांना त्या भूमिकेची तळमळच नाहीं त्यांच्याकडून भलतीच अपेक्षा केल्यामुळें हें असें झालें. दुसरा प्रकार दारूबंदीचा ठराव मांडतांनाचा. आधीं या ठरावाची आवश्यकता नव्हती, माझ्या दृष्टीनें तरी नव्हती. बरें, ठराव मांडावयाचाच तर श्री. अत्रे सूचक आणि श्री. जेधे अनुमोदक अशी विचित्र सांगड घालण्याचा हेतु काय होता ? दारू पिण्याची तरफदारी करण्यांत अत्र्यांनीं निम्म्याहून अधिक वेळ घालविला. ह्या झालेल्या प्रकारामुळें सामाजिक परिषदेची या ठरावामागील भूमिका काय आहे याबद्दल श्रोत्यांच्या मनांत संशय उत्पन्न झाला, इतका कीं, अध्यक्षांना त्याची जाणीव होऊन त्यांना कांहीं वेळ अध्यक्ष-पद सोडून साधा सभासद या नात्यानें परिषदेची विशुद्ध भूमिका मांडावी लागली. असे प्रकार न होण्याची खबरदारी विषयनियामक समितीनें घेतली पाहिजे आणि ठरावाचे सूचक व अनुमोदक काय बोलणार याची ढोबळ माहिती आधीं मिळविली पाहिजे.

परिषदेला महाराष्ट्रांत जें कार्य करावयाचें आहे तें फार अवघड व जोखमीचें कार्य आहे. लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे कीं, महात्मा फुले, रानडे, आगरकर, कर्वे, शिंदे यांनीं ऐन उमेदीचीं वर्षें त्या कामासाठीं दिलीं आणि छिन्नीनें पहाड फोडावा तसें अविरत काम केलें. ही परंपरा चालविणारे कार्यकर्ते परिषदेमधून निर्माण व्हावयास हवेत. फुले–रानड्यांच्या काळीं होती तितकी कठीण जमीन आतां राहिलेली नाहीं. त्यांच्या काळचें सरकार समाजसुधारणेविषयीं उदासीन होतें. तसें उदासीन सरकार आज नाहीं. उलट, सामाजिक कार्यकर्त्यांना साहाय्य करील असेंच आजचें सरकार आहे. पण ह्या अनुकूल गोष्टीं-बरोबरच आपल्या समाजांतील रूढ कल्पनांचा चिवटपणा साध्यासुध्या शाब्दिक आघातांना दाद देणारा नाहीं हेंहि विसरून चालणार नाहीं. त्यांचीं मुळें अदृश्य आहेत, खोल आहेत. तेथपर्यंत आम्हांला त्यांचा मागोवा घेत घेत गेलें पाहिजे. घरीं, दारीं, शाळा-कॉलेजांतून पोंचलें पाहिजे. हें काम धर्मयुद्धाच्या जिद्दीनेंच व्हावयास हवें. तरच कांहीं प्रगति करून दाखवितां येईल. तेवढी जिद्द परिषदेंतून निर्माण होईल अशी आशा करूं या.








# शिक्षक व समाजकार्य

'नवभारता'च्या मार्च १९५३ च्या अंकांत 'टिळक, गोखले व समाजकार्य' या आपल्या लेखांत माझे मित्र प्रा. कोगेकर यांनीं विवेचना-करितां जे तीन मुद्दे मांडले आहेत, त्यांबद्दल माझी भूमिका थोडक्यांत पुन: मांडतों. ना. गोखले यांजवरील माझ्या लेखांत मुख्य विषय गोखले यांचें व्यक्तिमत्त्व व कार्य हे असल्यामुळें माझ्या या प्रश्नावरील भूमिकेचें सुस्पष्ट निदर्शन झालें नसावें. प्रा. कोगेकरांचा लेख वाचूनहि माझी भूमिका योग्य आहे ही माझी समजूत कायम आहे. प्रामाणिक मतभेद व वृत्तींतील भेद यांमुळें कांहीं वेळां इच्छा असूनहि मतैक्य होऊं शकत नाहीं अशांपैकीं हा प्रसंग आहे. असो.

लो. टिळकांनीं डे. ए. सोसायटींतून राजीनामा दिला याचें प्रत्यक्ष कारण त्यांचा इतर कांहीं प्रमुख सहकाऱ्यांशीं असलेला वृत्तिभेद व परस्पर गैरसमज. परंतु त्याचें तात्त्विक व तेव्हां दोनहि पक्षांस कांहींसें अस्पष्ट असलेलें कारण म्हणजे शिक्षण व इतर समाजकार्य हीं दोन्ही एका व्यक्तीकडून यश-स्वितेनें एका वेळीं होऊं शकत नाहींत ही जाणीव. समाजकार्याच्या बाबतींतहि पुढें टिळक व गोखले या दोघांनींहि राजकीय क्षेत्रांतच आपलें कार्य बुद्ध्या प्राय: मर्यादित केलें, हीहि गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

ना. गोखले ह्यांनीं काय किंवा टिळकांनीं काय फर्ग्युसन कॉलेज सोडण्यापूर्वी शिक्षणेतर राष्ट्रकार्य केलें होतें हें सर्वांस माहीत आहे व ते दोघेहि असामान्य कर्तबगार असल्यामुळें त्यांनीं तेव्हांहि महत्त्वाचें कार्य केलें. परंतु गोखल्यांनीं 'सर्व्हंट्स् ऑफ इंडिया' या संस्थेची स्थापना १९०५ मध्यें-म्हणजे फर्ग्युसन कॉलेज सोडल्यानंतर-केली. त्या संस्थेची गोखल्यांनीं केलेली घटना, व फर्ग्युसन कॉलेज सोडतांना त्यांनीं केलेलें भाषण हीं वाचलीं तर सार्वजनिक कार्याचें प्रत्यक्ष नेतृत्व व शिक्षण-कार्य हीं एकाच वेळीं चालविणें शक्य नाहीं असेंच त्यांचें मत दिसतें. गोखले अकालीं निधन पावल्यामुळें त्यांचें कार्य अवचित संपलें. तसें झालें नसतें तर त्यांच्या हातून आणखी पुष्कळ फार महत्त्वाचीं कार्यें झालीं असतीं व तीं तशीं व्हावीं म्हणून त्यांनीं बुद्ध्या शैक्षणिक क्षेत्राच्या मर्यादा व बंधनें वेळींच सोडून दिलीं होतीं. 'भारत-सेवक-समाजा'ची स्थापना ही घटना गोखल्यांची एतद्विषयक विचारसरणी काय होती हें स्पष्ट दर्शविते व टिळकांपेक्षांहि गोखल्यांस शिक्षण व इतर सामाजिक कार्य-विशेषत: राजकारण-हें एकसमयावच्छेदेंकरून करण्याचा उद्योग नव्हे हें मान्य असावें, असें त्यांचें जीवन दर्शवितें.

अध्ययन, अध्यापन व समाजकार्य हीं सामान्यत: व्यक्ति एका वेळीं यशस्वितेनें व प्रामाणिकपणें करूं शकते का?-या तात्त्विक मुद्द्यावरील प्रा. कोगेकरां-चें विवेचन मला पटत नाहीं. अध्ययन, अध्यापन जीवनविमुख असतां कामा नये, तसें तें होईल तर त्याचें मूल्य व अर्थवत्ता नाहींशी होईल हा सिद्धान्त सर्वमान्य आहे. परंतु जीवनसंमुखता व जीवनांतील प्रत्यक्ष कार्याचा कांहीं भाग जबाबदारी-नें उचलणें यांत फरक आहे. विद्यार्थिदशा ही पुढील जीवनाची पूर्वतयारी असते व असली पाहिजे. परंतु म्हणून विद्यार्थ्यांनीं समाजकार्यांत प्रत्यक्ष भाग घ्यावा काय ? अध्यापक हे समंजस व प्रत्यक्ष व्यवहारांत असल्यामुळें, सामाजिक कार्यांत प्रत्येक घटक व्यक्तीस-मतदान, प्रसंगीं मतप्रदर्शन इत्यादि-जो भाग घ्यावयाचा असतो, तितका ते घेणारच. परंतु अध्ययन, अध्यापन व संशोधन यांच्या बरोबरीनें त्यांनीं इतर सामाजिक कार्यांत सक्रिय भाग घेणें इष्ट नव्हे. तसें त्यांनीं केल्यास त्यांच्या स्वत:च्या शिक्षणाच्या कार्यास जी एकाग्रता, जें नि:पक्षपातित्व व जी सर्वांगीण रचनात्मकता लागते ती त्यांच्या ठिकाणीं राहणार नाहीं. शिक्षकाची असलेली उत्साहशक्ति साहजिकच मर्यादित असते व ती अनेक क्षेत्रांत वापरली असतां परिणामकारक होत नाहीं व दोन्हीहि क्षेत्रांत माघार येते. स्वधर्माच्या आचरणानेंच व्यक्ति प्रगति-पर होते. ज्या वेळीं देशांत युद्ध किंवा युद्धतुल्य परिस्थिति असेल तेव्हां सर्व नागरिकांवर इतर कार्य सोडून संरक्षणाच्या कार्यास हातभार लाव-








ण्याची जबाबदारी असते. परंतु सामान्यत: आपआपलें कर्तव्य योग्य रीतीनें पार पाडूनच व्यक्ति समाजास अधिकांत अधिक उपयोगी पडूं शकते. शिक्षकानें सर्वांचें शिक्षण करावें. प्रसंगोपात्त भाषणें, लेख इत्यादि प्रकारें प्रचलित विषयावर मतें प्रदर्शित करावींत. स्वाभिमानास व सदसद्विवेकबुद्धीस न शोभतील अशीं बंधनें मानूं नयेत व समंजसपणाचा धडा घालून द्यावा. प्रत्यक्ष कार्य शिक्षणाचेंच (अध्ययन-अध्यापन-संशोधन) करावें, दुसरें कार्य करूं नये, ही माझी भूमिका आहे व ती मला निरपवाद वाटते.

वाडिया कॉलेज, पुणें. —प्र. रा. दामले

## शेंडूर येथील सर्वोदय केंद्र : खरी वस्तुस्थिति

'नवभारत' मासिकाच्या 'मार्च' १९५३ च्या अंकांत डॉ. सत्यपाल ठाकूर यांनीं लिहिलेल्या 'कोल्हापूर जिल्ह्याचें ओझरतें सामाजिक दर्शन' या लेखांत (पान १७ वर) सर्वोदय-क्षेत्रांतील शेंडूर या गांवच्या आपल्या मुक्कामाविषयीं जें लिहिलें आहे त्यांत सर्वोदय कार्यकर्त्यांवर अन्याय केला आहे. सर्वोदय कार्यकर्त्यांनीं वर्षाहून अधिक काळाच्या अवधींतसुद्धां गांवांत कांहींच केलें नाहीं, हें दाखविण्याचा त्यांच्या लेखाचा रोख दिसतो. त्यांत त्यांनीं आपलें मत सिद्ध करण्यासाठीं जीं उदाहरणें घेतलीं तीं अभ्यासू वृत्तीच्या जिज्ञासूला शोभण्यासारखीं नाहींत.

हें म्हणण्याचें कारण असें कीं, त्यांना वाटत असलेला 'प्राथमिक महत्त्वाचा असा स्वच्छतेचा कार्यक्रम'–जरी तो 'अत्यंत कमी खर्चांत व कमी त्रासामध्यें होणारा' असला तरी–खेड्यांतल्या लोकांच्या मनांत रुजायला फार तपश्चर्या करावी लागते, याचा डॉ. सत्यपाल यांनीं स्वत: कधीं अनुभव घेतलेला दिसत नाहीं. वर्धा गांवाजवळ शिंदी नांवाच्या खेड्याची स्वच्छता करण्याचा चंग खुद्द म. गांधींनीं बांधला होता आणि महिनेच्या महिने दररोज सकाळीं हा कार्यक्रम बापूंच्यासह आश्रमांतली मंडळी अंमलांत आणीत. तरी, कुत्र्याच्या शेपटीप्रमाणें, या मंडळींची पाठ फिरली कीं त्यांनीं झाडलेला भाग पुन: मुद्दाम खराब करण्यांत येई. ही अनुभवाची गोष्ट आहे. खुद्द विनोबा ज्या सुरगांवांत पवनारहून जाऊन सफाई करीत त्या गांवाचीहि अशीच अवस्था असे. सारांश, हें काम श्री. ठाकूर यांना वाटतें तितकें सहज होणारें नाहीं. शेंडूरचा अनुभव असाच आहे. तथापि गांवकऱ्यांना पटविण्यासाठीं म्हणून सर्वोदय-योजनेतर्फे तेथें तीन पायखान्यांचा एक प्रायोगिक पक्का संडास बांधण्यांत आला. त्याला सर्वोदय योजनेकडूनच सर्व खर्च दिला गेला नाहीं. गांवकऱ्यांनींहि खर्चाचा हिस्सा उचलला पाहिजे अशी अट घातली होती. पण ती अट सर्वांशीं गांवकऱ्यांनीं पूर्ण केली नाहीं. शिवाय कांहीं अंशीं तेथील कार्यकर्त्यानें संडासाच्या बांधणींत वाढ केली आणि त्या वाढीला पुरेसा खर्च गांवकऱ्यांकडून मिळाला नाहीं. म्हणून तो संडास तात्पुरता अपुरा राहिला. तो संडास, डॉ. ठाकूर म्हणतात त्याप्रमाणें, सर्वोदय-केंद्रांतील कार्यकर्त्यांसाठीं बांधलेला नाहीं, सार्वजनिक उपयोगाकरितांच बांधलेला आहे.

दुसरी उदाहरणादाखल म्हणून घेतलेली गोष्ट सूत-कताई-शिक्षणाची. सर्वोदय-योजनेच्या क्षेत्रांतील शाळांतून हस्तव्यवसाय–शिक्षण म्हणून सूत–कताईचेंच शिक्षण देण्यांत यावें अशी सर्वोदय–संचालकांची मागणी सरकारनें मान्य करून, त्याची पूर्व-तयारी म्हणून १९५० सालीं एक शिक्षण–शिबिरहि शिक्षकांना तयार करण्यासाठीं सरकारनें सर्वोदय–योजनेला घेऊं दिलें. पण सरकारच्या शिक्षण-खात्याकडून पुढील १ वर्षपर्यंत, हा हस्तव्यवसाय सुरू करण्याबाबत वारंवार विनंति करूनसुद्धां, कांहीं हालचाल करण्यांत आली नाहीं. शिक्षकांच्या बदल्या खात्याच्या नेहमीच्या कार्यपद्धती-(routine)प्रमाणें करण्यांत आल्या. त्या करतांना पूर्वींची योजना लक्षांत घेतली गेली नाहीं. सरकारी खात्यांत एकसूत्रीपणा (co-ordination) नसल्याचा आणि शिक्षण-खात्याला या व्यवसायाच्या शक्ती-(potentiality)संबंधीं










अश्रद्धा असल्याचा हा परिणाम आहे. तो सर्वत्रच अनुभवाला येतो.

डॉ. सत्यपाल यांनीं उदाहरणादाखल घेतलेल्या आक्षेपांचा मीं खुलासा दिला. डॉ. ठाकूर श्री. अण्णासाहेबांच्या बरोबर फिरत होते; त्याच वेळीं मीहि त्यांच्याबरोबर होतों, किंबहुना सर्वोदय–क्षेत्रांत मींच हा मुक्काम योजिला होता हें श्री. ठाकूर यांना माहीत होतें. आणि त्यांना हेंहि माहीत होतें कीं, मी पूर्वी या सर्वोदय योजनेचा संचालक होतों. विद्यमान संचालकहि आमच्याबरोबरच होते. तरी त्यांना किंवा मला, निदान दुसरी बाजू म्हणून तरी, सर्वोदय-योजनेच्या कामाविषयीं डॉक्टर–मजकुरांनीं विचारून घेणें जिज्ञासू या दृष्टीनें अवश्य होतें. पण ते जिज्ञासू नव्हतेच, त्यांना खरी स्थिति अभ्यासूच्या नजरेनें आणि बुद्धीनें जाणून घ्यायची नव्हती.

डॉ. सत्यपाल ठाकूर माझे स्नेही असूनसुद्धां त्यांच्या या 'अव्यापारेषु व्यापारा'मुळें मला इतकें लिहावें लागलें.

महाराष्ट्र-सेवा-संघ, पुणें. —भाऊ धर्माधिकारी

## बाहुबली गुरुकुलांतील स्वच्छता

डॉ. सत्यपाल ठाकूर यांच्या 'कोल्हापूर जिल्ह्याचें सामाजिक दर्शन' या लेखांत बाहुबलीसंबंधीं लिहिलेली माहिती ही थोडी विपर्यस्त आहे.

बाहुबली हें एक जैनक्षेत्र असून तेथें प्राचीन गुरुकुलपद्धतीवर चाललेलें पण आधुनिक विचार-सरणीची पूर्ण दखल घेत असलेलें एक गुरुकुल आहे. तेथें शिकणारे विद्यार्थी व शिक्षकवृन्द यांच्याशिवाय दुसरी वस्ती नाहीं. तेथें विद्यार्थ्यांना स्वच्छतेचें बाळकडू नेहमींच पाजलें जातें. त्यांच्या दैनंदिन कार्यक्रमांत सकाळ-संध्याकाळ दोन वेळ स्वच्छतेचा कार्यक्रम असतो. सर्वत्र नमुनेदार स्वच्छता असते. म्हणून 'येथें संडास नाहींत, ठिकठिकाणीं उकिरडे निर्माण करण्यांत आलेले आहेत, त्यांच्याशीं झालेल्या संभाषणावरून असें दिसलें कीं त्यांना स्वच्छतेची आवश्यकताहि वाटत नाहीं' हें डॉक्टरमहाशयांचें विधान विपर्यस्त आहे. विद्यार्थी व शिक्षकवृन्द वगैरे सर्व धरून तेथील लोकवस्ती २०० च्यावर नाहीं. सर्वजण आश्रमाच्या आवारा-बाहेर शेतांत प्रातर्विधीचा कार्यक्रम आटोपतात. त्यामुळें स्वतंत्र संडास बांधण्याचा प्रश्न तेथें उद्भवत नाहीं. एका बाजूस उंच डोंगर व दुसऱ्या बाजूस दऱ्याखोऱ्या व उतार अशी तेथील प्रादेशिक रचना असल्यामुळें, गुरुकुलीन आवारांतील व आजूबाजूचे खांचखळगे स्वच्छता केल्यानंतरच्या दगडाविटांनीं भरले गेले, तर त्याला डॉ. महाशय 'जागोजागीं उकिरडे निर्माण करण्यांत आले' असें म्हणतात ते चुकीचें आहे. तेथें संपूर्ण नवनिर्मिति सुरू आहे. सर्व विद्यार्थ्यांना मोफत शिक्षण दिलें जातें. चितोड-गडचें उदाहरण देऊन मध्ययुगीन धर्तीवर चाललेलें हें गुरुकुल आहे, असें डॉ. महाशयांना सुचवा-वयाचें असल्यास तें वस्तुस्थितीशीं विसंगत आहे. अर्वाचीन व प्राचीन दोन्ही काळांतील चांगल्या गोष्टींचें शिक्षण येथें दिलें जातें.

म. ब्र. आश्रम, कारंजा. —प्रे. दे. शहा

---

# सारसंकलन

## सरदार पटेलांची रोजनिशी

सरदार वल्लभभाईनीं कधीं डायरी लिहिली असेल हें संभवनीय वाटत नाहीं. परंतु त्यांनीं १९३० सालीं साबरमती जेलमध्यें मार्च-एप्रिल-मध्यें कांहीं दिवस डायरी लिहिली आहे. गांधीजीं-च्या दांडीकूचपूर्वीच सरदार पकडले गेले. त्यांनीं लिहिलेल्या या डायरीवरून त्यांच्या कांहीं व्यक्तिगत विशेषांवर उत्तम प्रकाश पडतो. श्री. नरहरिभाई परीख यांनीं लिहिलेल्या सरदारांच्या गुजरातींतील चरित्राचा २ रा भाग 'नवजीवन'-

तर्फे नुकताच प्रसिद्ध झाला आहे. त्यांत १९३० ते १९४२ सालचें सरदारांचें चरित्र व पर्यायानें राष्ट्रीय चळवळीचा इतिहास आलेला आहे. सदरहू ग्रंथांतील २ ऱ्या प्रकरणांतून डायरीचा पुढील भाग संकलित केलेला आहे :

" सरदार आपली डायरी लिहीत असतील अशी कल्पना करणें फारच कठीण आहे. सबंध जन्मांत त्यांनीं क्वचितच कधीं डायरी लिहिली असेल. पण साबरमती जेलमध्यें ते एकटे होते, म्हणून त्यांना हा विचार सुचला. ता. ७-३-३० पासून ता. २२-४-३० पर्यंतची डायरी त्यांच्या हातची लिहिलेली आहे. त्यांत साबरमती जेलमध्यें झालेल्या कित्येक महत्त्वाच्या घटना आहेतच, पण शिवाय सरदारांचें भक्तिपूर्ण हृदय, गुजरातेबद्दलची अगाध ममता, बापूंबद्दलचा भाव वगैरेंचें ओझरतें दर्शन आपणाला त्यांत होतें...

" ७-३-३० : रात्रीं ८ वाजतां साबरमती सेन्ट्रल जेलमध्यें बोरसदहून डे. सु. मि. बिलिमोरिया घेऊन आला. पकडतांना तसेंच येथें सोडतांना तो खूप रडला. रस्त्यांत फारच चांगुलपणानें वागला. रात्रीं क्वॉरन्टाईन वार्डांत ३ कांबळीं मिळालीं त्यांवर झोपलों.

" ८-३-३० : ...मीं एकच ज्वारीची भाकरी घ्यायचें ठरविलें. कैदेबाहेर चार-पांच वेळां संडासांत जावें लागे. चहा, सिगारेट वगैरे लालूच दाखवूनहि पोटाचें काम ठिकाणावर येत नसे. येथें ती लालूचच सोडून दिली आणि रोज एकदांच परसाकडे जावयाचें ठरविलें. मग शेवटीं तीन दिवसांनीं व्यवस्थित जमलें. तीन दिवस पडूनच होतों. रात्रंदिवस लोळायचें व फिरायचें एवढेंच ठरविलें. बराकींत फिरायला सुंदर जागा होती. तीन कडूलिंबाचीं झाडें व आश्रमासारखी स्वच्छता. मला ज्वारीची भाकरी खातांना पाहून एका वॉर्डरला रडें कोसळलें. आपल्या गव्हाच्या भाकरीची माझ्या भाकरीबरोबर अदलाबदल करायचा आग्रह करूं लागला. पण मीं नियमाविरुद्ध कांहींहि करायला तयार नाहीं असें म्हटलें. त्या भल्या वॉर्डरचे मीं आभार मानले.

" ९-३-३० : दुपारीं ३ वाजतां ( रविवारीं ) दोन भाकऱ्या, थोडें तेल व गूळ बरोबर देऊन कोठडींत बंद केलें. मीं 'तेल नकोच' म्हटलें. एक तर खोकला होताच, आणि कच्चें तेल खायचा कंटाळा. सायंकाळीं भाकरी व गूळ पाण्यांत भिजवून खाऊन टाकली. दोन्ही बाजूंचे दांत पडले असल्यामुळें भिजविल्यावांचून खातां येत नव्हतें.

" १०-३-३० : दुपारीं महादेवभाई व कृपलानी भेटायला आले. साहेब ( कृपलानी ) सिंधमधले आहेत. त्यांना गुजराती येत नाहीं व आम्हांला इंग्रजी बोलायचें नाहीं. तेव्हां जरा ऑफिसरांत चडफडाट झाला. शेवटीं तसेंच चालवलें...आराम अगदीं बेहद्द आहे. खाण्यापिण्याची कोठलीहि खास संवय ठेवलीच नव्हती. जमिनीवर कांबळें पसरून निजतांना एक दिवस कठीण वाटलें. पण मग कांहींहि अडचण भासली नाहीं. उकाड्यामुळें बाहेर उघड्यावर निजायची व रात्रीं बत्तीची मागणी केली, पण त्याला नकार मिळाला. त्यांनीं मला तसें लिहा म्हणून म्हटलें, पण मींच त्याला नाहीं म्हटलें. कोणत्याहि प्रकारची खास मेहेरबानी नकोच होती. म्हणून वर लिहावयाचा विचार रद्द केला...जेलच्या सूत-रहाटावर सूत कांतायचें सुरू केलें.

" ११-३-३० : सरकारांतून कांहीं तरी हुकूम आला कीं मला खास कैदी म्हणून ठेवावें व सोयी द्याव्या. मला तसें कळविण्यांत आलें. मीं म्हटलें, मला कोठलीहि सोय नको आहे. येथें सर्व तऱ्हेचें सुख आहे. मात्र एकच दुःख आहे. तें सांगायची जरूर नाहीं. पण सुपरिंटेन्डेन्टच्या आग्रहामुळें सांगितलें कीं, जसें हिंदुस्थानचें राज्य आपल्याच लोकांकरवीं चालतें, तसेंच या सबंध जेलमध्यें कोणी इंग्रज नाहीं, मग लढायचें कोणाशीं ?

" जेलरच्या अतिशय आग्रहावरून घरून आंथरूण व ताट, वाटी, लोटा हीं मागविलीं. शेठ अंबालाल साराभाईकडून आलेलीं ६ पुस्तकें मिळालीं. दिवा ठेवायची परवानगी मिळाली, तेव्हां रात्रीं ११ वाजेपर्यंत रामायण वाचलें. आजपासून








चहा, दूध, दही व पाव यांची सोय झाली, त्यामुळें तो बॉर्डर बिचारा खूप खूष झाला.

" १२-३-३० : सकाळीं ४ वाजतां उठून प्रार्थना केली. गीता वाचली. आज ६-३० वाजतां बापू आश्रमांतून (दांडीकूचसाठीं) निघणार आहेत ह्याचें स्मरण करून, खास ईश्वरस्मरण केलें व त्यांना यश मिळावें म्हणून प्रभूचें साह्य याचिलें...आजपासून सकाळीं एक पाव व दोन औंस लोणी मागितलें आहे.

" १३-३-३० : चार वाजतां उठलों. प्रार्थना व रामायण. वरून खाट व आंथरूण आलीं. बाहेर निजायची परवानगी मिळाली. दिवा बाहेर ठेवून रात्रीं वाचलें...

" १९-३-३० : आज सकाळीं अडीच वाजतां उठलों. Emma Hamilton चार वाजेपर्यंत वाचून पुरें केलें. मग प्रार्थना केली व रामायण वाचलें. पांच वाजतां O'connor चें 'Memoirs of an old Pariamentarian' भाग १ ला वाचायला घेतलें.

" २०-३-३० : 'विश्वभारती' मासिक विद्यापीठांतून आलें होतें, तें सुपरिन्टेन्डेन्टजवळच होतें, तें पाठविलें. 'प्रस्थान' मासिक व 'मॉडर्न रिव्ह्यू' अजून त्याच्याजवळच आहे. तीं तो देत नाहीं.

" २२-३-३० : दहा वाजतां वजन करायला डॉक्टर आले. तीन रत्तल वजन कमी भरलें. आज सकाळचें खायचें सोडलें. अपचनासारखें झाल्या-मुळें तोंड आलें आहे. संध्याकाळचें जेवणहि सोडलें आहे.

" २४-३-३० : आज एक वेळ खाल्लें. सायंकाळीं फक्त दूध घेतलें.

" ३१-३-३० : अंबालालभाईकडील सहा पुस्तकें वाचून टाकलीं. तीं आज परत पाठविलीं. त्यांनीं दुसरीं तीन पाठविलीं आहेत.

" १--४-३० : 'मॉडर्न रिव्ह्यू' व 'पंच्' वगैरे मॅगेझिनें दिलीं...

" २-४-३० : अन्नाबद्दल जेव्हां मर्जीला येईल तें मिळण्याची सोय झाली. तेव्हांपासून दोन-तीन दिवस प्रयोग करून ठरविलें कीं, सायंकाळीं फक्त दूध, भात व दुपारी रोटी, लोणी, भात, दही, डाळ (आमटी) भाजी हें खावयाचें.

" ६-४-३० : आज सकाळीं चार वाजतां उठून राष्ट्रीय सप्ताह साजरा करण्यांत यश यावें आणि गुजरातेची लाज राखली जावी म्हणून पुष्कळ प्रार्थना केली...

" ९-४-३० : कलेक्टर टेलर व पोलिस सुपरिन्टेन्डेन्ट ओ' गोरमन नऊ वाजतां आले. त्यांना 'खेडा जिल्ह्यांतील कैद्यांविषयीं काय करूं इच्छितां' तें विचारलें. मग ते तिकडे गेले. सर्व कैद्यांना माझ्या वॉर्डांत आणलें. त्यांच्याकडून कैद्यांच्या क्लासाबद्दलची हकीगत ऐकली. त्याचा निकाल करायचें टेलरनें ठरविलें होतें. त्यानें मार्ग काढला. त्यानें वाटेल त्याला वाटेल त्या क्लासांत नोंदलें तरी आमची हरकत नाहीं. मात्र आम्हां सर्वांना जेलमध्यें सारखीच ट्रीटमेन्ट मिळाली पाहिजे, मग आमची कांहींच हरकत नाहीं. सर्वांचें खाणें सारखें, राहायचें सर्वांनीं एकत्र आणि कोणत्याहि प्रकारचा भेदभाव असतां कामा नये, अशी व्यवस्था झाली, तर मग सरकारी दप्तरांत हवा तो वर्ग हवा त्याला दिला तरी आमची हरकत नाहीं. तो त्याप्रमाणें हुकूम देऊन गेला...

" १०-४-३० : ऑफिसांत सुपरिन्टेन्डेन्टनें खाण्यासंबंधीं वरून आलेला हुकूम दाखविला... मीं म्हटलें कीं प्रत्येक कैद्यागणिक सरकार किती खर्च करूं पाहतें तें आम्हांला सांगा, त्यांतून आम्ही आपली व्यवस्था करून घेऊं. पण आम्हांला अनुकूल नसलेली व्यवस्था तुम्ही कराल, आमच्या खातीं खर्च लिहाल, तर तें आम्हांला कबूल नाहीं. आम्ही सामान्य कैद्याचेंच खाणें घेऊं. आम्ही येथें मौजमजा करायला आलेलों नाहीं. तसेंच आम्हांला अमुक एक वस्तु पाहिजेच असें नाहीं. पण जें हक्कानें मिळत असेल तें आम्ही घेणार.... सायंकाळीं कळविलें कीं आमच्या म्हणण्याप्रमाणें कामचलाऊ व्यवस्था मंजूर केली आहे व सरकारकडे लिहिलें आहे.

" ११-४-३० : कलेक्टर, कामिशनर आले म्हणजे प्रत्येक कैद्यानें आपल्या कोठडीच्या दाराशीं सरळ उभें राहिलें पाहिजे, अशी मागणी सुपरिन्टें-








न्डेन्ट आमच्याजवळ सारखा करीत होता. मीं त्याला साफ नकार दिला आणि सांगितलें कीं, मानहानि होईल अशा कोणत्याहि स्थितीच्या अधीन व्हायला आम्ही तयार नाहीं. सभ्यता किंवा शिष्टाचार याबाबत आम्ही चूक करणार नाहीं. मात्र स्वाभिमानाला धक्का लावणारी कोणतीहि गोष्ट आम्ही स्वीकारणार नाहीं.

" १९-४-३० : जेलमधील इतर सामान्य कैद्यांत असंतोष आहेसें दिसलें. एका पुढारी कैद्याकडून कळलें कीं ते सर्व अन्नसत्याग्रह करणार आहेत. मीं त्याला कारण विचारलें आणि कांहीं त्रास किंवा तक्रार असेल तर प्रथम मला कळवा असें त्याला सांगितलें....

" २०-४-३० : त्या कैद्यांनीं सकाळपासूनच 'गांधीजी की जय' म्हणून घोषणा सुरू केल्या. आमच्यापैकीं तरुण लोकहि त्यामुळें क्षुब्ध झाले व सहानुभूतीदाखल अन्नत्याग करावा असें म्हणूं लागले. मीं नाहीं म्हटलें तेव्हां त्यांना राग आला. तरी पण मीं भक्कमपणा सोडला नाहीं.... सायंकाळीं मींहि त्यांना खूप समजाविलें. पण त्यांच्या तोंडावर अजूनहि रोष दिसतच होता.

" २२-४-३० : आज जेलमधल्या इतर कैद्यांनीं आपला उपवास सोडला. पण कामावर जायला नाहीं म्हटलें.'

" येथपर्यंतची डायरी लिहिलेली आहे. यांतील कैद्यांच्या वर्गाची व संयुक्त स्वैंपाकघराची व्यवस्था पुढें फार दिवस चालली नाहीं. महिना होईतों पर्यंत कैद्यांची संख्या फार वाढली व सरकारनें ही व्यवस्था बंद केली."

## एक सामाजिक समस्या

महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध विचारवंत व समाजशास्त्रज्ञ श्री. ना. गो. चापेकर यांचा 'एक सामाजिक समस्या' नांवाचा विचारप्रवर्तक लेख 'सह्याद्री' च्या फेब्रुवारीच्या अंकांत आला आहे. प्रसिद्ध पारशी विद्वान् प्रो. पी. ए. वाडिया यांच्या 'पारसीज् एअर दि शॅडोज् थिकन्' नांवाच्या पारशी समाजाच्या सद्यःस्थितीबद्दलच्या ग्रंथाच्या निमित्तानें श्री. नानासाहेब चापेकरांनीं समाजांतील पोरक्या मुलांच्या संगोपन-संवर्धनाचा प्रश्न चर्चिला आहे. त्यांतून महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे :

" प्रो. वाडियांनीं पारशी समाजांतील कित्येक कुटुंबांची पाहणी करून त्यांचा इतिहास चोखाळून आलेले अनुभव पुस्तकरूपानें प्रसिद्ध केले आहेत. हे अनुभव अत्यंत उद्बोधक आहेत... जगांतील आजच्या कौटुंबिक स्थितीचें तंतोतंत प्रतिबिंब आपणांस त्यांत स्पष्ट उमटलेलें आढळतें.

" ...आज कुटुंबसंस्था मोडकळीस आली आहे. तेथें ऐकमत्य होत नाहीं. एकसूत्रीपणा राहत नाहीं. मुलांवर ह्या सर्वांचा परिणाम झाला नाहीं तरच नवल... आईबाप कसे व्हावे हें शिकविणारीं विद्यालयें हवीं आहेत, पण तीं कोण काढणार?... मुलें हीं आई व बाप या दोघांचीं. असें असून कायदा एकालाच ओळखतो. आईबापांत वितुष्ट आलें कीं, अज्ञान मुलांचा ताबा एकालाच देण्याचा आग्रह कायद्यानें कां धरावा समजत नाहीं... आईबापांच्या भांडणांतून जेव्हां पालक नेमण्याचा प्रश्न उद्भवतो तेव्हां अशा मुलांची चिंता वाहणारा कोणी नाहीं. अशा स्थितींत मुलें दुराचारी निघणें अपरिहार्य आहे. हा अत्यंत बिकट असा सामाजिक प्रश्न आहे.

" पारशी समाजांतील एक हृदयद्रावक घटना —पोरक्या तीन बुद्धिमान् मुलींची करुणकथा—प्रो. वाडियांनीं नमूद केली आहे. त्या तीन हुशार मुली देशोधडीला आगल्या. समाजानें इतकें कर्तृत्व व्यर्थ दवडलें ह्याची हळहळ कोणाला वाटेल काय ? मुलें हीं राष्ट्रांची संपत्ति आहे, ती आपण गमावीत आहों. लोकांकडून जमीन मागून घेण्यापेक्षां मुलें मागा आणि त्यांना लौकिकवान् नागरिक बनवा असें सांगण्याची पाळी आली आहे. बहकलेल्या मुलांमुलींना उचित उपायांनीं सन्मार्गाला लावणारे कोणीच पुढारी पुढें येत नाहींत. ह्या मुलांकरितां स्वतंत्र संस्था निर्माण होणें अवश्य आहे. किंबहुना सरकारनें स्वतंत्र खातें स्थापन करून सरकारी व बिनसरकारी स्त्रीपुरुषांच्या मध्यस्थीनें हें सामाजिक स्वरूपाचें कार्य तडकाफडकीं हातीं घेण्याइतकें निकडीचें आहे. निदान प्रथम सरकारनें ठिकठिकाणीं वर वर्णिल्याप्रमाणें वायां जात चाललेलीं

मुलें आपल्या ताब्यांत घेऊन अनुरूप शिक्षण-पद्धतीचीं वसतिगृहें स्थापन करावीं.

"नाइलाजानें सामाजिक, कौटुंबिक व वैयक्तिक बाबींकरितां संस्था निर्माण करा म्हणून म्हणावें लागत आहे. खरा उपाय विवेकशक्तीचा विकास हाच आहे. शिक्षणानें अशा प्रकारचा विकास साध्य होतो. पण हें शिक्षणच विद्यमान-काळीं दुर्मिळ झालें आहे. प्रो. वाडियांनीं म्हट-ल्याप्रमाणें आम्ही शिकवितों, शिकत नाहीं.

"गतकालीं राष्ट्ररचना अशी होती कीं, कुटुंबाच्या बाहेर माणसाला कोणतेंच कार्य करण्या-सारखें नव्हतें. त्याला कुटुंबाचेंच अगत्य. आतां ही स्थिति अगदीं पालटली आहे. यांत्रिक युगामुळें, लोकशाही राज्यव्यवस्थेमुळें, मनुष्याचें खासगी जीवन संकोच पावून खळबळ करणाऱ्या राष्ट्रीय जीवनाकडे तो ओढला जात आहे. त्याचें कार्यक्षेत्र राष्ट्रव्यापी झालें आहे. हा बदल कुटुंबसंस्थेच्या मुळावर आला आहे...जनकत्वाच्या पलीकडे मुलांच्या मनावर इष्ट संस्कार करण्याचें सामर्थ्य आईबापांमध्यें राहिलें नाहीं. व्यक्ति आतां कौटुंबिक न राहतां सार्वजनिक झाली आहे. ह्यास्तव कुटुंबसंस्थेचें संवर्धन करूं पाहणारांचे प्रयत्न कित-पत यशस्वी होतील त्याची शंका वाटते. नवीन परिस्थितीला अनुरूप अशीच उपाययोजना करणें जरूर आहे..."

## पाकिस्तानांतील अहमदिया-विरोधी आंदोलन

जातीयतेची तुलना भस्मासुराशीं करतात. नुकती-च पाकिस्तानांत जी अहमदिया-पंथाविरुद्ध धर्म-युद्धाची घोषणा व चळवळ चालू होती, त्यामुळें तर ही तुलना सर्वांशानें खरी ठरली आहे. जातीयता हें पाकिस्तानचें एक शक्तिकेन्द्र होतें. आणि त्याच जातीयतेमुळें आज पाकिस्तानी सरकारपुढें बिकट परिस्थिति उभी राहिली आहे. कांहीं काळा-पूर्वी पूर्वपाकिस्तानांत जशी हिंदु अल्पसंख्यांकांची दशा झाली तशीच दशा अहमदिया नांवाच्या मुस्लिमधर्म मानणाऱ्या पंथाची करावी यासाठीं मुस्लीम मुल्लांनीं व मौलवींनीं जनतेला चेतविलें आहे. पाकिस्तानचे चाणक्यसदृश परराष्ट्रमंत्री श्री. झाफरुल्लाखान हे या पंथाचे असल्यामुळें त्यांच्या राजीनाम्याची मागणी करण्यांत येऊन त्यासाठीं निःशस्त्र आंदोलन प्रथमतः सुरू झालें. पण पाक पंजाबांत तर त्याची परिणति हिंसक अत्याचारांत झाली. तेथल्या मंत्रिमंडळाला राजीनामा द्यावा लागला आहे. अशा या मोठ्या बिकट परिस्थितीला कारण झालेल्या अहमदिया-पंथाविषयींची माहिती 'टाइम्स ऑफ इंडिया' (५-४-५३), वरून पुढें थोडक्यांत दिली आहे :

अहमदिया-पंथाचा इतिहास फार जुना नाहीं. १८८९ सालीं मिर्झा गुलाम अहमद यांनीं या पंथा-ची सुरुवात केली. बाबर बादशहाच्या वेळीं कोणी मिर्झा हादी बेग नांवाचा सरदार समरकंदहून हिंदु-स्थानांत आला व त्याला बाबरनें अमृतसरजवळील सध्यांच्या कादियान (Qadian) शहराच्या आजूबाजूला ७० खेड्यांवर काझी म्हणजे मामले-दार म्हणून नेमलें. त्यानें तेथें इस्लामपूर-काझी नांवांचें गांव वसविलें व तेंच पुढें कादियान नांवानें प्रसिद्ध झालें. हें कादियान गांव भारताच्या हद्दींत आहे व तेंच या पंथाचें मुख्य क्षेत्र आहे.

१८८० सालीं मिर्झा गुलाम अहमद यानें 'बर्हान-इ-अहमदिया' नांवाचें पुस्तक लिहिलें व आपल्याला दैवी साक्षात्कार घडला आहे असा दावा त्यांत केला. १८८९ सालीं अहमदिया-पंथाला त्यानें सुरुवात केली आणि आपणच मुस्लिमांचे सर्वश्रेष्ठ पैगंबर 'महदी' आहोंत, ख्रिस्त्यांचा 'मेसाया' (Messiah) पण आपणच आहोंत व हिंदूंचा 'निष्कलंक अवतार' सुद्धां आपणच आहोंत अशी घोषणा त्यानें केली. अहमदिया-पंथाचें जागतिकत्व अशा प्रकारें त्यानें सिद्ध केलें आणि सर्व धर्मांचे अंतिम प्रेषित आपणच आहोंत अशा मान्यतेनें तो लोकांपुढें आला.

याच्या शिकवणीचा परिणाम मुस्लिम जनतेवर खास झाला. त्यानें हें मान्य केलें कीं कुराण हेंच जगांतील सर्व ज्ञानाचें भांडार आहे. मात्र त्यानें असेंहि म्हटलें कीं, कित्येक भ्रष्ट आचारांमुळें इस्लामचा मूळचा जोम कमी झाला आहे. त्यानें कडव्या धर्मयुद्धाला विरोध केला असला, तरी हिंदु, ख्रिस्ती व शिया या धर्मांविरुद्ध त्यानें कडक







प्रवचनें केलीं. या अहमदिया-पंथाला कट्टर मौलवींकडून, ख्रिस्ती मिशनऱ्यांकडून व पंडित लेखराम यांच्यासारख्या आर्यसमाजीयांकडून अत्यंत विरोध झाला. या पंथाचीं तत्त्वें मिर्झाच्या पुढील तीन ग्रंथांत नमूद केलेलीं आहेत : 'फत्तेह् इस्लाम,' 'तौझी-इ-मरम' आणि 'इझाला-इ-औशम.' त्याच्या शिकवणींत भविष्यें वर्तविलेलीं असत व त्यांपैकी कांहीं खरींहि ठरत. उदा. पंडित लेखराम यांचा भयानक मृत्यु आणि अबदुल्ला ॲथॅम या ख्रिस्ती प्रचारकाचा अंत यांसंबंधींचीं भविष्यें प्रत्यक्ष घडलीं. या पंथाच्या प्रवर्तकानें म्हणणें असेंहि आहे कीं, ख्रिस्त हा क्रूसावर चढलाच नाहीं; तो हिंदुस्थानांत निसटून आला आणि काश्मीरांत त्याची कबरहि आहे !

सुरुवातीला या पंथाला फारसा पाठिंबा मिळाला नसला तरी आजमितीला या पंथाचे दशलक्षांवर अनुयायी आहेत. हिंदुस्थानच्या सभोंवतींच्या बहुतेक देशांत ते पसरलेले आहेत; आणि आफ्रिका, इंग्लंड व अमेरिका अशांसारख्या देशांत त्या पंथाच्या शाखा व प्रचारक आहेत. संख्येच्या मानानें फार मोठ्या प्रमाणांत या अहमदिया-पंथाचें वजन लोकांवर आहे. याचीं कारणें, त्या पंथांतील लोकांची आर्थिक सुस्थिति आणि त्यांचा धर्मांतराचा जाज्वल्य उत्साह हीं होत.

कट्टर जुना मुस्लीम धर्म आणि हा अहमदिया-पंथ यांच्यामधील मुख्य मतभेदाचा मुद्दा म्हणजे अहमदियांचा 'जेहाद' म्हणजे हिंसक धर्मयुद्धाला असलेला कडक विरोध हा होय. इस्लामचा अंतिम पैगंबर महदी हा योद्धाच असेल असें सनातनी मुस्लिमांप्रमाणें ते मानीत नाहींत. धर्मांतराचा त्यांचा मार्ग चर्चा आणि मतपरिवर्तन हा आहे. फाळणीपूर्वींच्या मध्य पंजाबांत अहमदी प्रचारक व आर्यसमाजी पंडित यांच्यांत मोठे कडाक्याचे वाद होत. खेळांच्या सामन्यांप्रमाणेंच, पण जातीय दृष्टीनें, बाजू पाडून केलेल्या या चर्चांमुळेंहि जातीय द्वेष उलट वाढीसच लागला.

अहमदियांचा सध्यांचा पंथप्रमुख मिर्झा बशीर-उद्दीन अहमद हा फाळणीनंतर पाकिस्तानांत गेला. परंतु त्यानें आपल्या कादियान या मुख्य क्षेत्रांत ३०० कुटुंबें तशींच ठेविलीं. फाळणीनंतरच्या हत्याकांडांत या अहमदीया कुटुंबांपैकीं कोणालाहि कांहीं त्रास पोंचला नाहीं ही गोष्ट हिंदु व शीख या उभयतांसहि भूषणावह आहे. कादियान येथें पुन्हां अहमदियांचीं संमेलनें भरूं लागलीं आहेत व त्यांचें धार्मिक कार्य अत्यंत शांतपणें चालू देण्यांत येत आहे ही गोष्ट हिंदुस्थानच्या निधर्मी वृत्तीचीच द्योतक आहे.

या अहमदीयांना पाकिस्तानांत एवढा विरोध व्हावा याचीं मुख्य कारणें धार्मिक, राजकीय आणि आर्थिक आहेत. धार्मिक मतभेद वर आलाच आहे. आर्थिक दृष्टीनें बहुतेक अहमदिया लोक भरभराटलेले आहेत हेंहि त्यांच्याबद्दलच्या द्वेषाचें एक कारण आहे. आणि मि. झाफरुल्लाखानांसारखी अहमदिया-पंथांतील प्रभावशाली व्यक्ति परराष्ट्रमंत्री असून पाकिस्तानी राजकारणावर तिची छाप फार आहे. माजी मुख्य प्रधान नाझिमुद्दीन यांच्या ते अंतरंगांतले आहेत ही गोष्ट त्यांच्याबद्दलच्या असूयेला कारण झालेली असावी.

कांहीं असलें तरी या अहमदीयाविरोधी चळवळीमुळें आणि अहमदीयांच्या चाललेल्या छळामुळें कट्टर धर्मनिष्ठ राज्यतंत्राचें व प्रजेचें अंतरंग उघडें पडलें आहे हें निश्चित.

## नवचीनमधील शिक्षणप्रसार

चीनमध्यें आर्थिक व राजकीय गोष्टींप्रमाणेंच शिक्षणाबाबतहि आमूलाग्र क्रांति घडत आहे. तिचें थोडें दर्शन 'मॉडर्न रिव्ह्यू'च्या जानेवारीच्या अंकांत दिलेल्या 'पीपल्स् रिपब्लिक ऑफ् चायना'-मधील चिनी शिक्षणसंस्थ्यांच्या वक्तव्यांतील एका उताऱ्यावरून घडतें. तेथून पुढील कांहीं भाग संकलित केला आहे :

"चीनमध्यें या सहामाहींत कॉलेजच्या विद्यार्थ्यांची संख्या २,१९०००, माध्यमिक शाळेंतील विद्यार्थी ३०,७०००० व प्राथमिक शाळांतील विद्यार्थी ४,९०,००,००० इतके असतील. १९४६ मध्यें चांग कै-शेकच्या कारकीर्दींत कॉलेज व माध्यमिक विद्यार्थ्यांच्या संख्येपेक्षां ही संख्या ३/२ नीं जास्त आहे व प्राथमिक शाळेंतील विद्यार्थ्यांची संख्या तर दुप्पट झाली आहे.








# सारसंकलन

" एंजिनिअरिंगकडे कॉलेजांतील ३५·४ टक्के विद्यार्थी गेलेले आहेत. १९४६ मध्यें फक्त १८·९ टक्केच होते. शिक्षक-अध्यापन कॉलेजांत १९४६ पेक्षां आज ९० टक्के संख्या अधिक आहे. या वेळीं माध्यमिक धंदेविषयक ( टेक्निकल ) शाळा मोठ्या प्रमाणांत वाढविण्यांत आल्या आहेत व त्यामुळें चीनच्या आर्थिक पुनर्घटनेच्या कामांत मदत होणार आहे.

" मजूर व शेतकरी यांच्या मुलांच्या शिक्षणाकडे खास लक्ष दिलें जातें. त्यांचीं मुलें प्राथमिक शाळेंत ८० टक्के, माध्यमिक शाळेंत ६० टक्के व कॉलेजांत २० टक्के असतात. शिवाय लहान मुदतीच्या प्राथमिक व माध्यमिक शाळा प्रौढ मजूर व शेतकरी यांच्या-साठीं उघडलेल्या आहेत. सरकारकडून कॉलेजें, माध्यमिक व्यावसायिक शाळा व शिक्षकअध्यापन शाळा यांतल्या विद्यार्थ्यांना जी अन्नविषयक मदत मिळते त्याव्यतिरिक्त या प्रौढ शाळेंतील विद्यार्थ्यांना खास निराळी मदत मिळते.

" रात्रींच्या शाळांसारख्या रिकाम्या वेळांतील शाळांची संख्याहि वाढत आहे. या वर्षी ३०,२०,००० मजूर त्यांत शिकत आहेत. १९५१ मध्यें १ कोटी ४० लक्ष शेतकरी तेथें शिकले. १९५२ मध्यें त्यांची संख्या २ कोटी ४० लक्ष होईल असा अंदाज आहे. गेल्या हिंवाळ्यांत साक्षरता-प्रसाराच्या शाळांत ४ कोटी २० लक्ष शेतकरी होते; येत्या हिंवाळ्यांत ही संख्या ५ कोटींपर्यंत जाईल असा अंदाज आहे.

" चीनमधील या नव्या शिक्षणपद्धतीचें वैशिष्ट्य हें आहे कीं, कोणत्याहि मार्गाकडून उच्च-शिक्षणाकडे विद्यार्थ्यांना जातां येतें. थोड्या मुदतीच्या शाळा, रिकाम्या वेळांतील शाळा व व्यावसायिक शिक्षणाच्या शाळा यांतूनहि, माध्यमिक शाळांप्रमाणेंच, उच्च शिक्षणाच्या विद्यालयांत प्रवेश मिळूं शकतो. अशा प्रकारें विद्या-पीठें व कॉलेजें हीं श्रमजीवी लोकांच्या मोठ्या संख्येला मोकळीं करून देण्यांत आलीं आहेत. "

' शिक्षण अने साहित्य 'च्या मार्चच्या अंकांत यासंबंधीं लिहितांना ' हरिजन 'चे संपादक श्री. मगनभाई देसाई यांनीं पुढील माहितीहि टीपेंत उदधृत केली आहे. ते लिहितात :

" येथें आणखी एक गोष्ट नमूद करावयास पाहिजे. ती ही कीं, चीनमधील उच्च शिक्षणाचें कामहि चिनी भाषेंतूनच चालतें, व तेथेंहि पाठ्य-पुस्तकांच्या मालिका लावलेल्या नसतात. ही गोष्ट चीनमध्यें जाऊन आलेल्या श्री. मुजीब यांनीं आपल्या डायरींत नमूद केली आहे. ते म्हणतात कीं, ' विद्यापीठांतील ग्रंथालयांत असलेल्या पर-देशी भाषेंतील पुस्तकांचा उपयोग हे विद्यार्थी फारसा करूं शकत नाहींत. सर्व शिक्षण चिनी भाषेंतून चालतें व चीनबाहेर मिळणारें ज्ञान पर-देशी भाषा जाणणारे विद्यापीठीय अध्यापक सरळ मिळवितात. यामुळें युवकांच्या मनाला फार श्रमन्ती करावी लागण्यासारखी स्थितीच तेथें नाहीं. ' आपल्याकडेहि असेंच व्हावयास पाहिजे. इंग्रजी भाषा विद्यार्थ्यांवर लादण्याची कांहींहि जरूरी असूं नये. "

## नवचीनचीं लोक-ग्रंथालयें

' चायना रीकन्स्ट्रक्ट्स ' ( सप्टें.-ऑक्टो. १९५२ ) वरून श्री. **भगवान् कृष्ण वाडीकर** ( पुणें ) यांनीं चीनच्या लोक-ग्रंथालयांविषयीं पुढील माहिती संकलित केली आहे :

पूर्वी चीनमध्यें ग्रंथालयें होतीं, परंतु तीं ग्रंथालयें खऱ्याखुऱ्या अर्थानें लोक-ग्रंथालयें नव्हतीं. ग्रंथालयाच्या इतिहासाकडे जर आपण पाहिलें तर असें दिसून येईल कीं, सर्वसाधारण देशांमधून ग्रंथालयें ऐश्वर्याचीं, देशाच्या मानाचिन्हाचीं अशीं प्रतीकें होतीं. त्यापासून सर्वसाधारण लोकांना उपयोग नव्हताच. जितकीं म्हणून ग्रंथालयांत पुस्तकें कमी फाटलेलीं, जितका नीटनेटकेपणा जास्त, तितकें ग्रंथालय आदर्श, अशी सर्वसाधारण कल्पना होती. थोडक्यांत ग्रंथालय हें प्रदर्शनाचें एक दालन, असें समजण्यांत येत असे. असा ग्रंथालयाचा सर्वसाधारण इतिहास आहे. त्याला चीनच कसा अपवाद असणार ? चीनमध्यें पूर्वी ग्रंथालयांची वाढ अगदींच व्यस्त प्रमाणांत होती. मुळांत ग्रंथालयांची संख्या कमी व व्यवहारांत

सावळागोंधळ त्यामुळें चीनची ग्रंथालयविषयक परिस्थिति बरीच असमाधानकारक होती.

क्रांतीनंतरच्या काळांत नवचीनचें सांस्कृतिक दृष्ट्या जें पुढचें पाऊल पडलेलें दिसतें, त्याला तेथील ग्रंथालयाची क्रान्तिकारक वाढ व यशस्वी सुधारणा ह्या गोष्टी प्रामुख्यानें जबाबदार आहेत. क्रांतिकालानंतर या प्रांगणांत फारच झपाट्यानें वाढ झालेली दिसते. तेथील ग्रंथालयांचें कार्य हें नवचीनच्या सांस्कृतिक व शैक्षणिक ध्येयाचें प्रतीक समजलें जातें.

नवचीनच्या ग्रंथालयांची रचना ही देशव्यापी अशी झालेली आहे. तेथील ग्रंथालयांना सुसंबद्ध स्वरूप देण्यासाठीं पुढील संस्थांचें त्यांना सहकार्य मिळतें : ( १ ) तेथील सांस्कृतिक खात्या-( Ministry of Culture ) च्या नेतृत्वाखालीं राजधानीपासून ते लहान खेड्यापर्यंतचीं ग्रंथालयें चालत असतात. ( २ ) नवचीनच्या शिक्षणखात्या-( Ministry of Education ) च्या नेतृत्वाखालीं १४० विद्यापीठ-ग्रंथालयें, ६०० माध्यमिक-शालेय ग्रंथालयें आणि इतर असंख्य शालेय ग्रंथालयें काम करीत असतात. ( ३ ) अखिल-चीन मजूर-संघटनेच्या साहाय्यानें कामगारांसाठीं ग्रंथालयांच्या कार्याचें एकच एक असें सुसंघटित जाळें विणण्यांत आलें आहे. ( ४ ) सैनिकांसाठीं संरक्षणखात्यातर्फे ग्रंथालयांचें संवर्धन करण्यांत येतें.

नवचीनमधील प्रादेशिक ग्रंथालयाचें कामकाज हें इतर ग्रंथालयास आदर्श व मार्गदर्शनपर असें असतें. पुढीलप्रमाणें प्रादेशिक ग्रंथालयें अस्तित्वांत आलीं आहेत : ( १ ) 'पेकिंग ग्रंथालय' हें चीन लोकराज्याच्या नेतृत्वाखालीं काम करतें. हें मध्यवर्ती ग्रंथालय आहे. ( २ ) पूर्व चीनमधील 'नांकिंग ग्रंथालय'. ( ३ ) नैर्ऋत्य चीनमधील 'च्युंग-किंगचें लोकग्रंथालय'. ( ४ ) वायव्य चीनमधील 'लॅनचाउ ( Lanchow ) चें लोक-ग्रंथालय'. ( ५ ) ईशान्य चीनमधील मुकडेनचें लोक-ग्रंथालय. ( ६ ) वुचँग ( Wuchang ) ला नुकतेंच निघालेलें प्रादेशिक ग्रंथालय

पेकिंग ग्रंथालयांत मे १९५२ मध्यें २१,४८०८७ ग्रंथसंख्या होती. १९५१ मध्यें पेकिंगच्या मध्यवर्ती ग्रंथालयातर्फे ६ भव्य प्रदर्शनें आणि ५८ लहानलहान प्रदर्शनें भरविलीं गेलीं. शिवाय १० संदर्भसुलभ अशा ग्रंथावल्या ( Bibliographies ) उपलब्ध केल्या गेल्या. पेकिंग-ग्रंथालयानें ग्रंथांच्या देवाण-घेवाणीसाठीं फारच मोठ्या प्रमाणांत १८ प्रमुख ग्रंथालयांशीं संबंध जोडले आहेत. शास्त्रीयज्ञानसंवर्धनासाठीं रशियासुद्धां ७ देशांशीं ग्रंथ-देवाण-घेवाणीचे संबंध प्रस्थापित केलेले आहेत.

प्रादेशिक ग्रंथालयांची वाढ पुढीलप्रमाणें दिसून येते :

| वर्ष | ग्रंथालयसंख्या |
|---|---|
| १९५० | ३७ |
| १९५१ | ४५ |
| १९५२ | ५९ |

प्रत्येक प्रादेशिक ग्रंथालय स्वतःच्या नेतृत्वाखालीं स्थानिक महत्त्वाच्या गोष्टींचें संशोधन करवून घेतें. उदा. द. कुन्मिंग ग्रंथालयानें युनान प्रांताच्या इतिहासाच्या संशोधनासाठीं स्वतंत्र असा विभाग निर्माण केला आहे.

सध्यां लोक-ग्रंथालयांमध्यें शिशु व बालकांसाठीं ग्रंथालयाचा व वाचनालयाचा स्वतंत्र असा विभाग चालविला जातो. शिवाय बालकांसाठीं स्वतंत्र मोठीं अशीं ग्रंथालयें नवचीनमध्यें अस्तित्वांत आलीं आहेत.

क्रांतिपूर्वकालांत कामगारवर्ग संस्कृतीपासून मुद्दाम अलग ठेवला गेला होता. ज्ञानसंपादनाची मक्तेदारी ठराविक वर्गाकडेच होती. म्हणून सर्वसाधारण लोकांस त्याचा फायदा मिळत नव्हता. क्रांतीनंतर सर्व ग्रंथालयें कामगारांस मुक्तद्वार ठेवण्यांत आलीं. तेथील कामगार-मंडळांनीं स्वतःकरितां अशा मोठ्या ग्रंथालयांची स्थापना केली आहे. 'लायब्ररी ऑफ ट्रेड युनियन कौन्सिल'नें कामगार-ग्रंथालयांच्या ८ शाखा निरनिराळ्या शहरीं काढलेल्या आहेत. 'कामगार-मंडळाची ग्रंथालयपद्धति' ही नवचीनमधील कामगारवर्गाच्या सांस्कृतिक दृष्ट्या झालेल्य वाढीचें द्योतकच होय.

नवचीनमधील खेड्यांतील ग्रंथालयेंसुद्धां फारच










प्रगत झालेलीं दिसतात. त्यांचा उपयोग सर्वसाधारण अशिक्षित खेडूतांस साक्षर करण्यासाठीं होतो. तेथील ग्रंथपाल हा खेडूतांमधूनच निवडलेला असतो व हवी असलेली आर्थिक मदत तेथील खेडूतच जमवितात.

ज्या वेळीं ग्रंथालयामध्यें नव्या व जुन्या पुस्तकांचा समावेश करण्यांत येतो. तेव्हां लोकांच्या गरजेकडे अधिक लक्ष पुरविण्यांत येतें केवळ दुर्मिळ व महाग अशा ग्रंथावलींना व ग्रंथावलीविषयक पुस्तकांना तेथें स्थान दिलें जात नाहीं. ग्रंथालयामधून लोकांच्या पर्यंत ज्ञानाचा प्रसार व्हावा म्हणून संस्कृतिवाहकां (culture vans)-ची योजना तेथील ग्रंथालयें करतात. पुस्तकांची ग्रंथालयांतून लोकांकडे देवाण-घेवाण कावडीसारख्या साधनांच्या द्वारें होते.

## दक्षिण आफ्रिकेंतील उत्क्रांतिविषयक दोन शोध

दक्षिण आफ्रिकेचा प्रदेश विचित्र तर खराच! मानवी जीवनांतील एक दुःखमय प्रकरण तेथें सुरू असतांच मानवी जीवनाचे जुने कठिण दुवे उकलण्याचें विधायक कार्यहि तेथें चालूं आहे! मानवाच्या मानसिक व नैतिक विकासाला हरताळ फांसणारा वर्णद्वेष आणि 'काळा आदमी 'च्या संहाराची तयारी ज्या देशांत जारीनें चालू आहे, तेथेंच मानवाच्या शारीरिक विकासांतील खालच्या व वरच्या थरांतील गूढ पोकळीच्या जागा रचनात्मक शोधानें भरून काढण्याचे उत्कृष्ट प्रयत्नहि तेथेंच चालू आहेत! प्राणिजीवनाच्या उत्क्रांतींत माश्याचें स्थान सर्वात खालच्या टोंकाला म्हणजेच जीवसृष्टीच्या सुरुवातीला आहे, तर 'आदिमानव' म्हणजेच पूर्ण शारीरिक विकासाचा मानव–Anthropus–हा अगदीं वरच्या टोंकाला आहे. खालच्या टोंकाच्या मत्स्याहून वरची मत्स्याची एक जात फार प्राचीन काळीं होती व ती आज नामशेष झाली आहे, असें शास्त्रज्ञ मानीत. त्या मत्स्याचें शास्त्रीय नांव 'सी-ले-कॅन्थ' (Coelacanth–उच्चारतः See-le-kanth) असें आहे. त्याचें अस्तित्व अजूनहि आफ्रिकेच्या किनाऱ्यावर शक्य आहे असें मत्स्यविज्ञानांतील जगप्रसिद्ध तज्ज्ञ प्रो. जे. एल्. बी. स्मिथ यांनीं अनेक वर्षांपूर्वी जाहीर केलें होतें. त्याप्रमाणें १९३८ सालीं त्या जातीचा मासा एका कोळ्याला सांपडला. पण त्याचें विच्छेदन करण्याच्या वेळेपर्यंत तो सडून गेल्यामुळें त्याच्या शरीररचनेंतील उत्क्रांतिशास्त्रीय वैशिष्ट्यें समजूं शकलीं नाहींत. यंदा नव्या वर्षाच्या सुरवातीला त्याच जातीचा एक मासा उपलब्ध झाला. तो आणण्यासाठीं प्रो. स्मिथ ग्रॅहॅमस्टाउनच्या -होड्स् विद्यापीठांतून पंतप्रधान डॉ. मालन यांनीं दिलेल्या खास विमानांतून रवाना झाले. 'टाइम्स् ऑफ् इंडिया 'चे प्रतिनिधि एरिक रॉबिन्स् यांनीं १८ व २३ जानेवारीच्या अंकांतून प्रो. स्मिथ व दुसरे संशोधक जॉन टाल्बोट रॉबिन्सन् यांची माहिती दिली आहे, ती फारच वाचनीय आहे.

ह्या सी-ले-कॅन्थ जातीच्या माश्याचे दोन्ही बगलेंत असणारे वल्हींवजा पडदे किंवा कल्ले माणसाच्या पंजांसारखे असतात. त्यांना पुढें बोटांचा आकारहि असतो. या माशांतूनच पुढें जल-स्थलचर अशा दुहेरी शक्तीचे सरपटणारे प्राणी निर्माण झाले असावेत. या वर्षीं मिळालेल्या माशाच्या छेदनांतून उत्क्रांतिविषयक काय नवा प्रकाश गवसतो तें अजून कळलेलें नाहीं. पण हा मासा अजून आफ्रिकेच्या लगतच्या दर्यांत अस्तित्वांत आहे ही गोष्ट पुनः सिद्ध झाली हेंहि फार महत्त्वाचें आहे.

दुसरा शोध आदिमानव जो 'ॲन्थ्रोपस्' त्याच्या आधींचा मानवी उत्क्रांतीचा दुवाच असलेल्या आदिमानवपूर्व प्राण्या-(telanthropus)-चा सांगाडा होय. वानरांच्या जातींतील मानवसदृश असा नर-वानर (ape-man) ही वानरांतील शेवटची पायरी आणि माणसांतील आदिमानवाची पहिली पायरी. यांमधील हरवलेला दुवा (missing link) म्हणून या आदिमानवपूर्व माणसाच्या सांगाड्याचें महत्त्व फार आहे. संशोधक रॉबिन्सन् हे प्रिटोरियाच्या ट्रान्सव्हाल म्यूझिअम वरील उच्च हुद्द्याचे अधिकारी आहेत. त्यांना दक्षिण आफ्रिकेंतील क्रुजेर्सडॉर्फजवळच्या स्वार्टक्रान्स् येथें टेलॅन्थ्रोपसचे पांच प्रस्तरीभूत (fossilized) सांगाडे सांपडले. दक्षिण आफ्रिकेंतील शास्त्रज्ञांचें



अनुक्रमणिका






या शोधाबाबत असें मत आहे कीं, नर-वानर आणि खरा आदिमानव या दोहोंतील वैशिष्ट्यांनीं युक्त अशा एका प्राण्याचें अस्तित्व होतें हें सिद्ध करणारी सदरहू घटना म्हणजे या शतकांतील एक फार महत्त्वाची घटना होय. रॉबिन्सन् यांच्या मतें, आतां थोड्याच वर्षांत उत्क्रांतीच्या दोन्ही टोकांमधील अजूनहि प्रकाशांत न आलेले दुवे उजेडांत येतील आणि मग उत्क्रांतिवादाच्या विरोधकांचीं तोंडें या भक्कम पुराव्यामुळें कायमचीं मिटतील.

या 'टेलॅन्थ्रोपस' प्राण्यांचा वरचा ओठ आदि-मानवाच्या वरच्या ओठापेक्षां अधिक लांब असावा व त्याची हनुवटी बारीक असावी असा रॉबिन्सनचा तर्क आहे. हा प्राणी बोलत असावा कीं नाहीं या-बद्दल त्यांनीं कांहीं निश्चित मत दिलेलें नाहीं. पण या संक्रमणावस्थेंतील प्राण्याला मानवी मेंदूसारखा मेंदू होता व तो कसल्या तरी प्रकारची वाणी वापरीत असला पाहिजे असें ते म्हणतात. या सांगाड्याशेजारीं दगडी हत्यारें सांपडलीं नाहींत, यावरून तो प्राणी दगडी हत्यारें वापरण्याएवढा उत्क्रान्त झालेला नसावा असें त्यांना वाटतें. या प्राण्याचें नाक तत्कालीन नर-वानराच्या, माकडाच्या नाकाएवढें बसकट नसावें. ह्याचा मेंदू पूर्वीं तेथेंच गवसलेल्या प्रस्तरीभूत नरवानरांच्या मेंदूपेक्षां मोठ्या आकाराचा असावा. कारण जंगलांतील मानवाचें नाक अजूनहि टेलॅन्थ्रोपसच्यासारखेंच आढळून येतें, असेंहि त्यांचें मत आहे.

नर-वानरांच्या वेगवेगळ्या पांच जातींचे सांगाडेहि दक्षिण आफ्रिकेंत सांपडले आहेत. त्यांतील बाकीच्या जाती उत्क्रांतींत नामशेष झाल्या असल्या तरी निदान एका जातीचा नर-वानर तरी या टेलॅन्थ्रोपसमध्यें उत्क्रान्त झाला असला पाहिजे. हा प्राणी खऱ्या मानवाचा पूर्वज होता हें निश्चित. मात्र तो शरीररचनादृष्ट्या आधुनिक मानवा-('होमो सेपिएन')सारखा असेलच असे नक्की सांगतां येत नाहीं.

## स्वप्नांची लांबी

रॅट्क्लिफ्च्या 'ए हिस्टरी ऑफ् ड्रीम्स' या ग्रंथांतून खालील माहिती संकलित केली आहे :

स्वप्नाचा अभ्यास करणाऱ्यास, शोधान्तीं कळलें कीं, सर्वसाधारण स्वप्न फार तर तीस सेकंद टिकतें; पण स्वप्न पडणाऱ्या व्यक्तीस मात्र वाटतें रात्रभर स्वप्न पडत असावें. एका माणसाला झोंपीं गेल्यावर स्वप्न मध्यरात्रीं पडलें : तो समुद्रावर मुशाफरीस गेला. एका जहाजावर त्यानें पुष्कळ काळ नोकरी केली. तें जहाज फुटून बुडत असतां या माणसानें मोठ्या शिताफीनें आपला जीव बचावला आणि एका निर्जन बेटास पोहत पोहत तो लागला. अनेक दिवस त्यानें जहाजाची वाट पाहिली व शेवटीं आशाच सोडून दिली. शेवटीं त्याच्या भाग्यानें एक जहाज त्या बेटास लागलें व त्यांतील माणसांनीं त्याला आपल्यांत घेतलें. पुढें तो स्वतः त्या जहाजाचा मुख्य बनला. आणि आपल्या सहकाऱ्यांसह तो चांचेगिरी करूं लागला. त्याचें जहाज अनेक समुद्रांवरून पर्यटन करी. या जीवनाचा त्याला अखेरीस उबग आला. इंग्लंडला आपलें जहाज त्यानें नांगरलें आणि जहाज विकून किनाऱ्यावरील एका गांवीं कसलासा धंदाहि त्यानें सुरू केला. पण दुर्दैव त्याचें ! एक दिवस कोणीं तरी त्याला 'लुटारू बंडखोर' म्हणून ओळखलें. तो पकडला गेला आणि त्याला फांशीची शिक्षा झाली. त्याच्या गळ्याभोंवतीं फांस पडला आणि कोणत्या क्षणीं मृत्यु येणार याची तो वाट पाहात होता—! इतक्यांत तो दचकून जागा झाला. शेजारच्या चर्चमधील मध्यरात्रीचे बाराचे टोल पडायला सुरुवात झाली, तेव्हां तो झोंपीं गेला होता, आतां जागा झाला तेव्हां त्या बारांतील शेवटचे टोल संथपणें पडत होते !

---

## लोकशाहीची व्याख्या—

"जनतेच्या आर्थिक व सामाजिक जीवनांत रक्तपातावांचून क्रांति घडवून आणणारी सरकारी यंत्रणा व कार्यपद्धति म्हणजे लोकशाही" —डॉ. आंबेडकर (पुण्याच्या वकील-मंडळापुढें केलेल्या भाषणांतून.)










अनुक्रमणिका

